# लाडकी [illegible] आणि इतर गोष्टी



प्रो. ना. सी. फडके. एम्. ए.



प्रकाशक

कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणें २.

## प्रो. ना. सी. फडकेकृत पुस्तकें.

### कादंबऱ्या

१ अल्ला हो अकबर
२ कुलाब्याची दांडी (२ री आ.)
३ जादुगार (२ री आ.)
४ दौलत (२ री आ.)
५ अटकेपार
६ निरंजन
७ कलंकशोभा
८ उद्धार
९ काश्मिरी गुलाब
१० आशा
११ प्रवासी
१२ समरभूमि
१३ उन्माद
१४ गुप्त प्रायश्चित्त
१५ इंद्रधनुष्य
१६ प्रतिज्ञा
१७ वादळ
१८ शाकुंतल

### गोष्टी

१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ „ „ „ „ „ २ रा
३ लोला आणि इतर गोष्टी
४ नमुनेदार गोष्टी
५ उल्हासकथा
६ वत्सला आणि इतर गोष्टी
७ चंद्रा आणि इतर गोष्टी
८ लाडकी लक्ष्मी आणि इतर गोष्टी

### ललितनिबंध

१ गुजगोष्टी (२ री आ.)
२ नव्या गुजगोष्टी
३ धूम्रवलयें

### प्रबंध

१ मानसोपचार
२ मानसोन्नति
३ सुखाचे संसार
४ संततिनियमन
५ आजचे तरुण स्त्री-पुरुष व त्यांजपुढील प्रश्न (२ री आ.)
६ प्रतिभासाधन (२ री आ.)
७ वाङ्मयविहार
८ आधुनिक गीता
९ मानसमंदिर
१० साहित्य व संसार
११ आकाशवाणी
१२ वेचलेले मोती

### चरित्रें

१ दादाभाई नौरोजी (३ री आ.)
२ टेरेन्स मॅक्स्विनी
३ डी. व्हॅलेरा

### नाटकें

१ युगांतर
२ संजीवन
३ जडावाची देवी
४ तोतया नाटककार
५ आगलावी
६ क्षमेसाठीं अपराध

### टीकात्मक

१ टाकीचे घाव.

### इंग्रजी

1 Sex Problem in India (2nd Edition)
2 Psychology
3 Elements of Ethics
4 Manual of Logic (3rd Edition)
5 Birth Control (2nd Edition)
6 History of Philosophy

# आमचीं प्रकाशनें आणि इतर पुस्तकें

**प्रकाशनें—**

बोलघेवडा
लाडकी लक्ष्मी
छोटी नली
चंद्रा
वत्सला
धूम्रतरंग
उल्हासकथा
सुधारणा
श्रावणांतल्या विजा
रात्रींतले निखारे
मंदज्योति
अनिर्बंध जीवन
सुरसुरी
वणवा
चित्रा
चांदण्यांतील सांवल्या
कलावंतांच्या सहवासांत
नवा प्रातःकाळ
स्वाति
नादनिनाद

**इतर पुस्तकें—**

तुटलेले तारे
अतिप्रसंग
प्रकाशांतील व्यक्ति
नीलेचा दिलरुबा
मोगरीचा गजरा
भंगलेली मूर्ति
लघुकथा
सह्याद्रीच्या पायथ्याशीं
ना० गोखले-चरित्र
ताई अन् भाऊ
आहुति
सैन्यांतील आठवणी
न्याय-वैद्यक
जीवनसंग्राम

**आगामी कादंबऱ्या—**

**शाकुंतल**— ना. सी. फडके, एम्. ए.
**चल पुढें**— वि. वि. बोकील, बी. ए., बी. टी.

## लाडकी लक्ष्मी : : १

संस्थानांतल्या त्या दोन गांवांना 'आंबेवाडी' आणि 'बोरवाडी' अशीं नांवं होतीं त्यावरून कुणी जर असा तर्क केला असता, कीं एका गांवांत आंबे अन् दुसऱ्या गांवांत बोरं फार होत असलीं पाहिजेत तर तो चुकीचा ठरला असता. दक्षिण महाराष्ट्रांतल्या कोणत्याहि जराशा मोठ्या खेडेगांवांत त्या त्या मोसमांत गांवठी आंबे आणि बोरं जेवढीं मिळतात तेवढींच या दोन गांवांतल्या लोकांना मिळत असत. आंबेवाडीला बोरवाडी किंवा बोरवाडीला आंबेवाडी अशीं नांवं पडायला सुद्धां कांहीं हरकत नव्हती. कारण प्रत्यक्ष आंब्यांच्या अगर बोरांच्या वैपुल्याशीं त्या नांवांचा कांहीं संबंध नव्हता. परंतु नांवं फार पूर्वी केव्हां तरी पडलीं होतीं खरीं, आणि त्या त्या गांवच्या लोकांना त्या त्या नांवाबद्दल विलक्षण आपलेपणा व अभिमान आज कित्येक पिढ्या वाटत आला होता. आंबेवाडीच्या लोकांना जर आज कुणी म्हटलं असतं, कीं तुमच्या गांवाचं नांव बदलून बोरवाडी असं करूं तर त्यांनीं तें बिलकुल ऐकलं नसतं, आणि बोरवाडीचं नांव बदलून आंबेवाडी करण्याच्या कल्पनेचा बोरवाडीच्या लोकांनींहि अगदीं निकरानं प्रतिकार केला असता. कारण सामान्यतः कोणत्याहि माणसाला आपलं जन्मभूमीचं गांव वेडंवांकडं,

सुपीक दुष्काळी, पुढारलेलं मागासलेलं, कसंहि असलं तरी त्याबद्दल जो अभिमान इटकून वाटतो तो तर या दोन गांवांतल्या लोकांच्या मनांत होताच, परंतु त्याच्या भरीला आज कित्येक पिढ्यान् पिढ्या त्या दोन गांवांत हरएक बाबतींत चढाओढ, तेढ, मत्सर, त्यांतून निघणारा द्वेष, वैर इत्यादि ज्या गोष्टी साचत आल्या होत्या त्याहि होत्या. या दोन गांवांतला विरोध इतका तीव्र स्वरूपाचा होता, कीं बोरवाडीविषयींचा तिटकारा दाखविण्यासाठीं बोरं न खाणारे कांहीं लोक आंबेवाडींत होते, आणि आंब्याला न शिवणारे लोक बोरवाडींत होते. या दोन गांवांच्या मधून विस्तव जाणं कांहीं शक्य नव्हतं.

परंतु जिथून विस्तव नेणं शक्य नाहीं तिथून पाणी न्यायला काय हरकत आहे असा विनोद करण्याची बुद्धि जणूं निसर्गाला झाली होती; आणि त्यामुळें या दोन गांवांमधून एक भला मोठा ओढा वाहत जाऊन, खालीं कित्येक मैलांवर मिरजेच्या जवळपास कृष्णेला मिळाला होता. हा ओढा उन्हाळयांत अगदीं रोडावत असे, परंतु त्या अवस्थेंतहि उजव्या डाव्या अंगच्या आंबेवाडी, बोरवाडी येथील लोकांची पिण्याच्या पाण्याची गरज तो भागवीत असे. हिंवाळयांत आणि वसंतऋतूंत त्या ओढ्यांत चांगलं माणसाच्या पोटऱ्या भिजतील इतकं पाणी असे, आणि ऐन पावसाळयांत तर एखाद्या लहानशा नदीच्या दिमाखानं त्याचा गढूळ खळखळाट चालू असे. साधारणतः पाण्याला महाग असलेल्या या टापूंत या दोन गांवांच्या वाट्याला मुबलक पाण्याचं वैभव यावं हा मोठा चमत्कार होता! अडाणी लोक कोणत्याहि चमत्काराचं श्रेय निसर्गाला द्यायला तयार नसतात व त्या चमत्काराभोंवतीं ते एखादी दंतकथा उभी करीत असतात. शिवाजी महाराजांच्या काळांत या भागांत विसोबा कुलकर्णी नांवाचे एक साधुपुरुष होते. एकदां दुष्काळांत लोकांचे होणारे हाल पाहून ते खडतर तपश्चर्येला बसले. शंकर प्रसन्न होऊन वर मागण्याची वेळ येतांच या भागांत सदा वाहत राहील असा ओढा त्यांनीं मागून घेतला. ज्या पडक्या देवळांत विसोबा तपश्चर्येला बसले होते तिथल्या पिंडींतून लगेच पाणी झिरपूं लागलं, आणि आंबेवाडी व बोरवाडी या दोन गांवांमधून ओढा वाहत गेला. — ही दंतकथा या भागांत आबालवृद्धांच्या तोंडून ऐकायला मिळेल. या दंतकथेमुळेंच या ओढ्याला 'पिंडीचा ओढा' असं नांव पडलं होतं.

पिंडीच्या ओढ्यामुळें आंबेवाडी व बोरवाडीच्या लोकांचं पाण्याचं दुर्भिक्ष कायमचं नष्ट झालं हें खरं, पण एकमेकांशीं भांडणाच्या कुरापती काढण्याची सोयहि या ओढ्यानं करून दिली. दोन्ही गांवच्या बायका पाणी भरायला अगर धुणीं धुवायला ओढ्याच्या समोरासमोरच्या कांठावर येत, उनाड पोरं आणि पुष्कळदा मोठ्या वयाचे तालीमबाज पठ्ठे डुंबायसाठीं दोन्ही बाजूंनीं पाण्यांत उतरत, आणि दोन्ही गांवांतलीं जनावरंहि दोन्ही सांजांना या ओढ्यावर आणलीं जात. मग एकमेकांच्या कलागती काढण्याच्या संधीला काय तोटा ? ओढ्याच्या कांठावर झालेल्या शिवीगाळींतून अगर मारामारींतून कधीं कधीं इतके मोठाले खटले उत्पन्न होत, कीं ते कित्येक दिवस चालत, व ते लढविण्यासाठीं साताऱ्याहून, पुण्याहून नामांकित वकील आणण्याची या दोन गांवच्या गांवकऱ्यांत स्पर्धा लागून, हजारों रुपयांचा चुराडा होत असे.

संस्थानानं काँग्रेसच्या सल्ल्यानं अर्धं पाव स्वराज्य जाहीर केलं आणि ग्रामपंचायतींची स्थापना केली तेव्हांपासून या दोन गांवांचा प्रश्न म्हणजे एक मोठा बिकट पण तितकाच मनोरंजक प्रश्न होऊन बसला होता. एखादी गोष्ट बोरवाडीच्या लोकांनीं मान्य केली, कीं केवळ बोरवाडीचे लोक अनुकूल आहेत या एकाच कारणानं आंबेवाडीच्या लोकांनीं त्या गोष्टीला कसून विरोध करावा. किंवा असंहि होई, कीं एखाद्या सुधारणेसाठीं आंबेवाडीच्या लोकांनीं शंभर रुपये जमा केले तर आपण दोनशें रुपये जमवून आंबेवाडीच्या लोकांचा नक्षा उतरूं असं बोरवाडीच्या लोकांनीं ठरवावं. त्या दोन गांवांतल्या स्पर्धेचा आणि वैराचा वारा कोणत्या दिशेनं वाहील त्याचा कांहीं नेम सांगवत नसे. दोन्ही गांवचे लोक मोठे हट्टी, करारी आणि पिळाचे होते. एकमेकांचा पाणउतारा कसा करायचा आणि वैर कसं साधायचं याचा विचार ते बारा महिने तेरा काळ करीत असत.

वर्षांतला एक दिवस मात्र असा असे कीं, त्या दिवशीं या दोन गांवांतलं हें परस्परयुद्ध तहकूब होत असे, आणि दोन्ही गांवची मंडळी सारं वैर विसरून एकमेकांत मिसळत असत. हा दिवस म्हणजे श्रावण महिन्यांतला अखेरचा सोमवार. ज्या विसोबांच्या तपश्चर्येनं पिंडीचा ओढा वाहूं लागला होता त्यांची समाधि आंबेवाडीच्या उत्तरेला असलेल्या एका लहानशा टेकडी-

वर होती. या समाधीवर मोठं सुंदर देऊळ बांधलं गेलं होतं, त्याचा खर्च दोन्ही गांवच्या लोकांनीं केला होता, देवळाची वहिवाटहि दोन्ही गांवांतल्या लोकांकडून समाईक रीतीनं चालत असे, आणि श्रावणांतल्या अखेरच्या सोमवारीं या ठिकाणीं जी जत्रा भरे तिच्यांत दोन्ही गांवची सारी मंडळी मोठ्या हौसेनं सामील होत असत. 'विसोबांची जत्रा' म्हणजे एक मोठा धामधुमीचा अन् चिकार गर्दीचा दिवस असे. संस्थानांतल्या साऱ्या खेड्या-पाड्यांतून लहानथोर माणसं जत्रेसाठीं जमत. इतकंच नव्हे तर सातारा, कऱ्हाड, कोल्हापूर, इस्लामपूर, सांगली, मिरज इत्यादि ठिकाणांहून विसोबांच्या समाधीवर बिल्वपत्र टाकण्यासाठीं शेंकडों लोक येत.

१९४१ सालीं ही जत्रा फारच थाटाची झाली. या जत्रेचा फायदा घेऊन ग्रामोद्धाराचं कार्यहि साधावं या हेतूनं संस्थानच्या मंत्रिमंडळानं शेतकी प्रदर्शन, गुरांचं प्रदर्शन, खादी बाजार, व्याख्यानं इत्यादि कार्यक्रम ठेवले होते. त्यामुळें दरवर्षीच्या दसपट माणूस यंदा जत्रेला लोटलं होतं. मिठाईचीं दुकानं, कळसूत्री बाहुल्यांचे खेळ, बंगाली जादू दाखविणाऱ्या लोकांच्या राहुट्या इत्यादि करमणुकीच्या गोष्टींनाहि यंदा अगदीं ऊत आला होता. आणि विशेष म्हणजे वाफेच्या शक्तीवर फिरणारं लोखंडी पाळण्याचं एक भलं मोठं रहाटगाडगं घेऊन मुंबईचा एक माणूस आला होता. इकडल्या खेडवळ लोकांना लांकडी रहाटगाडगं माहीत होतं, पण वाफेवर चालणारं इतकं उंच आणि भव्य चक्र ते प्रथमच पाहत होते. पाळण्यांत बसण्यासाठीं लोकांना पाळी लावून उभं राहावं लागत होतं, आणि नुसत्या बघ्या लोकांची तर त्या जागीं अष्टौप्रहर ही दाटी होऊन राहिली होती! हे बघे लोक फकफक असा मोठ्यांदा आवाज करणाऱ्या एंजिनकडे पाहून आपली करमणूक करून घेत, अगर यंत्राला लावलेले सारे पाळणे माणसांनीं भरून जाऊन चक्राकार फिरूं लागले कीं, पाळण्यांतल्या लोकांना उद्देशून आरोळ्या देत व शिट्या फुंकीत; अथवा पाळण्यांतल्या माणसांत कुणी ओळखीचं माणूस दिसलं तर 'अरे तो पाहिलास का अमका' किंवा 'ती पाहिलीस का ती ही' असं एकमेकाला कोपरखळ्या देऊन कुजबुजत.

बोरवाडीच्या बापू पाटलाची तरुण मुलगी सोनी पाळण्यांत बसतांना पाहिल्याबरोबर त्या बघ्या लोकांतले किती तरी लोक एकमेकांच्या कानाला

लागले व म्हणाले, 'बापू पाटलाची सोनी कीं रे', 'लई दांडगी दिसायला लागली रे', 'बापू पाटलानं हिला अजून उजवली कशी नाय?' 'खुशाल एकटी आलीया जत्रेला', 'काय गड्या तुझ्या डोळयाच्या खाचा झाल्या व्हय? तिच्यासंगं त्या तीन बाया हैती. दिसत न्हाई तुला?' 'बाया हैती र, पर कुणी बाप्या नग सोबतीला?'...

तितक्यांत पाळणे फिरूं लागले आणि आपली कुजबूज बंद करून यां लोकांनीं शिट्या फुंकायला आणि आरोळ्या मारायला सुरुवात केली. त्यांतल्या एकानं नुकत्याच कुठें तरी ऐकलेल्या फोनोंतल्या 'नाखवा' गीताच्या धर्तीवर शीघ्र कवन करून उंच स्वरांत म्हटलं,

" पाळणा हालव हालव, जरा जपून फिरव ।
साडी जरीकिनार
चोळी काळी बुट्टेदार
लाल ओठांचि नार
बसलि म्होरं संभाळ
जरा जपून फिरव । पाळणा हालव हालव ॥

तो चावटपणा कुणाला उद्देशून होता तें पाळण्यांत बसलेल्या सोनीच्या लक्षांत आलं. पाळणा कळसावरून खालीं झुकत होता तेव्हां तिनं तें कवन म्हणणाऱ्या इसमाकडे पाहून तीव्र निषेधाचा असा कांहीं कटाक्ष टाकला, कीं तो पाहिल्याबरोबर तो चांगलाच चपापला; त्याचं कवन तावडतोब बंद झालं. मागच्या बाजूनं पाळणा पुन्हा कळसाकडे वर चढत असतांना सोनीनं पुन्हा त्या इसमाकडे जी नजर टाकली तिचा स्पष्ट अर्थ असा होता कीं, " बोरवाडीच्या बापू पाटलाची एकुलती एक मुलगी आहे मी. तें फाजील गाणं बंद केलंस म्हणून बरं झालं. नाहीं तर तुला चांगलंच शासन मिळालं असतं. माझे बापू म्हणजे बोरवाडीचा राजा आहे. या आंबेवाडीचे लोकसुद्धां हें जाणून आहेत...!"

चक्र फिरायचं थांबलं व एकेक पाळणा जमिनीला टेकून रिकामा होऊं लागला. सोनी ज्या पाळण्यांत बसली होती तोहि जमिनीजवळ आला व ती आपल्या तिघी मैत्रिणींबरोबर उतरून चालूं लागली. गर्दीतून वाट काढीत त्या पांचपन्नास पावलं गेल्या नसतील तोंच, मागून कुणाची तरी शीळ

ऐकूं आली व सोनीची एक मैत्रीण झटकन् मागं पाहून तिचा खांदा दाबून म्हणाली,

"त्यो मगाचाच चावट दिसतोया."

सोनी तिला म्हणाली, "तो काय करतोय आपल्याला ? तुम्ही भिऊं नका."

विसोबाच्या जत्रेच्या दिवशीं कुणीं कुणाची आगळीक करायची नाहीं असा आंबेवाडी-बोरवाडीच्या लोकांनीं आज कित्येक वर्षं मानलेला करार होता. त्यामुळें हा फाजील मनुष्य आंबेवाडींतला असला तर तो अधिक अमर्यादा करणार नाहीं अशी सोनीची खात्री होती; आणि जत्रेला लोटलेल्या इतर गांवच्या लोकांपैकीं तो एक असला, अन् त्यानं कांहीं अधिक प्रसंग केला तरी त्याचा प्रतिकार करण्यास आपण चौघी काय समर्थ नाहीं, असा विचार सोनीनं केला असला पाहिजे. ज्या मैत्रिणींबरोबर ती जत्रेला आली होती त्या अगदीं खेडवळ असल्या तरी आपली लज्जा कशी राखावी याचे खेडवळ उपाय त्यांना माहीत होते. आणि सोनी स्वतः तर शिकायसाठीं चार पांच वर्षं पुण्यांत राहिली असल्यामुळें, तिच्या अंगीं सुशिक्षित स्त्रीचा आत्मविश्वास आलेला होता.

आज जत्रेसाठीं येतांना खेड्यांतल्या मुलीला शोभेसा साडीचोळीचा पोशाख जरी तिनं केला होता, तरी तो करण्याच्या तऱ्हेंत, आणि तिच्या एकंदर बोलण्याचालण्यांत व मुद्रेंत व्यक्त होणारा नागरी संस्कार कुणाच्याहि ध्यानांत सहज येण्यासारखा होता. उंची वस्त्रांचा खेडवळ थाट करून तिच्याबरोबर चाललेल्या मैत्रिणीहि अशा ऐटींतच पावलं टाकीत होत्या, कीं जणूं प्रत्येक पावलागणिक त्या विचारीत होत्या, आम्ही कुणाच्या संगतीनं चाललों आहोंत, माहीत आहे ? पुण्याच्या शाळेंत इंग्रजी शिकणारी बापू पाटलाची एकुलती एक लाडकी मुलगी सोनूताई आहे आमच्याबरोबर !

बोरवाडीसारख्या संस्थानी मुलखांतल्या एका छोट्या गांवांतली एक मुलगी पुण्याच्या इंग्रजी शाळेंत शिकत असावी ही मोठी आश्चर्यकारक घटना होती. संस्थानच्या अधिपतींनीं आपल्या जुन्या सनातनी धर्माचा अभिमान बाळगून सवंग लोकप्रियता संपादली होती. पण आधुनिक सुधारणेच्या बाबतींतहि आपलं पाऊल कांहीं मागं नाहीं असं दाखवून आपलं लोकप्रियतेचं गाठोडं संभाळण्याचा प्रसंग त्यांच्यावर पुष्कळदा येई. अशा प्रसंगीं ते म्हणत, "पाश्चात्य

सुधारणांपैकीं आम्हांला ज्या योग्य वाटतात त्यांचा अंमल आमच्या संस्थानांत आम्ही करीत असतों. स्त्रीशिक्षणाकडे आमचं पूर्ण लक्ष आहे. अहो, आमच्या एका छोट्याशा बोरवाडी नांवाच्या गांवांतली एक मुलगी पुण्याच्या फीमेल हायस्कूलमधें शिकत आहे..."

राजेसाहेबांच्याकडून देणगी काढण्याच्या आशेनं सभा-संमेलनांचं अध्यक्ष-स्थान देणारीं माणसं, कोणत्याहि विषयावरच्या व्याख्यानांत दडपून दिलेले हे त्यांचे उद्‌गार ऐकले कीं, टाळयांचा गजर करीत. त्या टाळया ऐकल्या कीं राजेसाहेब मनांत म्हणत, 'काय बनवतों आहे आपण लोकांना', आणि लोक मनाशीं म्हणत, 'काय बनवतों आहोंत आपण या संस्थानिकाला.'

संस्थानच्या श्रीमंतांनीं लोकप्रियता लाटायसाठीं कितीहि थापा मारल्या तरी, सोनी इंग्रजी शिकायसाठीं पुण्यास कां गेली त्याचं खरं कारण निराळंच होतं हें त्याना माहीत होतं. त्या कारणाची आठवण झाली, कीं त्यांच्या मनाला मोठी गंमत वाटे, व बोरवाडी आणि आंबेवाडी या दोन' गांवांचा प्रश्न जसा चिकट तसाच मनोरंजक आहे हा त्यांचा आवडता उद्‌गार ते आपल्या मनाशीं काढल्यावांचून राहत नसत. सोनी पांच वर्षांपूर्वी इंग्रजी शिक्षणासाठीं पुण्यास गेली ती कांहीं स्त्रीशिक्षणासाठीं राजेसाहेब तळमळत होते म्हणून नव्हे, सोनीनं शिकायचा हट्ट घेतला म्हणूनहि नव्हे, किंवा आपली लेक फार हुशार आहे तेव्हां तिला इंग्रजी शिक्षण द्यावं असं वाटण्याची अक्कल बापू पाटलाला होती म्हणूनहि नव्हे. आपल्या लेकीला इंग्रजी शिकवून मोठी करायची कल्पना बापूच्या डोक्यांत जोरानं आली याचं खरं कारण फार वेगळंच होतं. आंबेवाडी आणि बोरवाडी या गांवांत हरएक बाबतींत जी कित्येक वर्षांची जुनी स्पर्धा होती तिच्यामुळें हा चमत्कार घडला होता.

बापू पाटील जसा बोरवाडीचा पुढारी होता तसा आंबेवाडीचा पुढारी येसू जगदाळे होता. याच्याकडे पाटीलकी वगैरे कांहीं नव्हती. परंतु याची शेती मोठी होती. गेल्या पांच पिढ्या जगदाळ्यांच्या घरांतलीं कर्तीं माणसं एकाहून एक हुशार व कल्पक निघालीं होतीं. त्यांनीं आपली शेती तर विशेष यशस्वी केली होतीच, पण शिवाय साऱ्या लोकांवर वचक ठेवून आंबेवाडीचं पुढारीपण टिकवलं होतं. बापू पाटील आणि येसू जगदाळे यांच्यांतली चुरस इतकी तीव्र होती, कीं तिऱ्हाइताला ती कधीं कधीं हास्यास्पद वाटावी.

बापूच्या गोठ्यांत जितक्या दुभत्या गाईम्हशी असतील तितक्या आपल्याहि गोठ्यांत पाहिजेत असं येसूला वाटे; येसूनं कऱ्हाडहून टांगा खरेदी करून आणला त्याबरोबर दहा दिवसांच्या आंत बापूच्याहि घरापुढें कोरा करकरीत टांगा दिसला. मोठे पाहुणे घरीं आले म्हणजे बापू त्यांना चहाबरोबर कोणतीं बिस्किटं देतो त्या चौकशीवर येसूनं असावं आणि त्याहूनहि महागाईचीं बिस्किटं आणून ठेवावीं; येसूला मुलगा आहे आणि आपल्याला नाहीं याची खंत वाटून बापूनं तीन बायका केल्या होत्या ! पण त्याला कांहीं केल्या मुलगा झाला नाहीं. हें शल्य बापूच्या मनाला फार टोचत असे आणि या उणेपणाची भरपाई तो इतर हजार गोष्टींनीं करूं पाहत असे. येसूचा मुलगा श्रीरंग मॅट्रिक झाला आणि मुंबईस कॉलेजांतलंहि शिक्षण घेऊं लागला हें पाहिल्यावर येसूच्या या मोठेपणाच्या तोडीला आपल्याजवळ कांहीं तरी पाहिजे अशा ईर्षेनं बापू पाटलानं सोनीला इंग्रजी शिकवून मोठी करायचं ठरवलं होतं.

सोनीला स्वतःला अर्थातच ही गोष्ट माहीत नव्हती. आपण खूप शिकावं आणि हुशारी दाखवावी अशी आपल्या बापूंची फार इच्छा आहे असंच ती समजत होती. तिला स्वतःला स्वभावतः शिकण्याची हौस होती व पुण्याच्या शाळेंतलं वातावरणहि तिला फार आवडलं. त्यामुळें ती शिक्षणांत अगदीं रमून गेली. वर्षांतून दोनदां मोठ्या सुट्टींत ती घरीं येई तेवढीच. बाकी वर्षभर ती पुण्यास असे. यंदा विसोबाच्या जत्रेला जोडून मोठालं प्रदर्शन भरणार आहेत तेव्हां तूं ये, असं बापू पाटलानं तिला लिहिलं होतं म्हणून ती चार दिवसांसाठीं आली होती. गेल्या पांच वर्षांत तिची विसोबाची जत्रा चुकली होती. आणि त्यामुळेंच जत्रेची गंमत अगदीं पुरेपूर पाहण्यासाठीं ती आज आपल्या मैत्रिणींबरोबर घराबाहेर पडली होती.

जत्रेंतल्या साऱ्या गोष्टी पाहायच्या असा सोनीचा हट्ट होता. दिवस सरूं लागला तशा तिच्या मैत्रिणी तिला म्हणूं लागल्या, "पाहिलं तेवढं बस झालं ग. चल जाऊं आतां माघारीं." पण सोनीनं तें ऐकलं नाहीं. हें राहिलं, तें पाहिलं पाहिजे असं तिचं सारखं चाललं होतं, व ती आपल्या तिघी मैत्रिणींना फरपटत बरोबर ओढीत होती. त्यामुळें या चौघी शेवटीं विसोबाच्या समाधीची टेकडी उतरून वाटेला लागल्या तों सूर्य

क्षितिजाखालीं केव्हांच बुडाला होता. सोनीच्या मैत्रिणी सासुरवासणी होत्या. त्यांचीं पावलं घाईनं पडूं लागलीं. सोनीनं विचारलं,

"अग पळतां काय अशा?"

तेव्हां त्यांच्यापैकीं एक म्हणाली, "आतां दिवेलागणी व्हईल. इतका येळ केला म्हून खेटरं न्हाई बसली घरला पोंचल्यावर म्हंजे मिळवली. आम्ही काय बापाच्या घरीं न्हाई. तुला कळायचं न्हाई त्ये, सोने."

"कोणी राग भरत नाहीं तुम्हाला. प्रत्येकीच्या घरीं मी स्वतः येईन. मग तर झालं? पण अशा पळूं नका बाई!"

तथापि, सोनीच्या मैत्रिणींचीं मनं कांहीं स्वस्थ होईनात. वेळ वांचविण्या-साठीं मोठा रस्ता सोडून जवळच्या आडवाटेनं जाण्याची कल्पना त्यांनीं काढली व सोनीला ती मान्य करावी लागली. मनांतल्या मनांत मात्र तिला वाटलं, कीं अशा अंधारांत आडवाट करण्यांत धोका आहे. पण तो विचार तिनं कांहीं बोलून दाखवला नाहीं.

ती आडवाट ज्या ठिकाणीं पिंडीच्या ओढ्याच्या कांठाशीं संपत होती तिथें त्या येतांच कुणी तरी मोठ्यांदा शीळ घालतंयसं त्यांना वाटलं. ती ऐकतांच त्या सर्वजणी चपापल्या.

ती शीळ आतां त्यांच्या ओळखीची झाली होती!

एकमेकींचे हात धरून त्या क्षणभर जागच्या जागीं उभ्या राहिल्या. तितक्यांत जवळच कुणी तरी गुणगुणलेलं त्यांना ऐकूं आलं—

"साडी जरीकिनार
चोळी काळी बुट्टेदार.."

त्या चौघींच्या मनांत आल, आपल्याला न कळत तो फाजील इसम आपल्या मागोमाग आला होता तर!

आतां कोणता प्रसंग ओढवणार याची त्यांना पूर्ण कल्पना आली, व या प्रसंगाला कसं तोंड द्यायचं याचे विचार त्यांच्यापैकीं प्रत्येकीच्या मनांत झटकन येऊन गेले.

तें गाणं थांबलं आणि दुसऱ्याच क्षणीं जवळ जवळ येणाऱ्या त्या माणसाची आकृति त्यांना अंधारांत दिसूं लागली.

सोनीनं दरडावून विचारलं, "कोण रे तूं?"

तो माणूस मोठ्यांदा हसला आणि त्यांच्या अगदीं जवळ येऊन ठेपला.

सोनी धैर्यानं म्हणाली, " पुढें ये तर खरा. पायताणानं सडकून काढूं."

तो मनुष्य फक्त हसला.

सोनीच्या मैत्रिणींनीं मोठ्यांदा किंकाळ्या फोडल्या.

आतां संकट टळत नाहीं असं वाटतांच सोनी देखील ओरडली, " धांवा, धांवा."

तो पागल माणूस पुन्हा हसला.

दुसऱ्याच क्षणीं त्यानं सोनीचा हात पकडला असता. परंतु तितक्यांत—

एक मनुष्य कुठून तरी दौडत आला व त्यानं आपल्या हातांतल्या वेताच्या छडीचा असा कांहीं फटका त्याला लगावला, कीं त्याच्या डोळ्यांपुढें चांगलेच काजवे चमकले असले पाहिजेत. प्रतिकार करण्यासाठीं तो उलटणार तोंच त्याच्या अंगावर वेताची छडी पुन्हा पांचसहा वेळां झपाट्यानं बसली, आणि मग मात्र त्यानं वाकड्यातिकड्या शिव्या देत पळ काढला.

जत्रेला जोडून झालेल्या प्रदर्शनाच्या व्यवस्थापक मंडळांत बापू पाटील असल्यामुळें, ते घरीं परत आले ते समारंभाचं मांडवपरतणं पार पाडल्यावर दुसऱ्या दिवशीं रात्रीं. पिंडीच्या ओढ्यावर सोनी व तिच्या तिघी मैत्रिणी संकटांत सापडल्या होत्या याची वार्ता गांवांत कुणालाच लागली नाहीं तशी बापू पाटलांनाहि लागली नाहीं. सोनीनंच ही हकीगत सांगितली तर त्यांना कळण्यासारखी होती. खरं म्हणजे एक गमतीचा अनुभव म्हणून सोनीनं ती बापाजवळ सांगितलीहि असती. परंतु त्या रात्रीचा तो प्रसंग सोनीच्या बाबतींत केवळ एक गमतीचा अनुभव ठरला नव्हता. त्याचा तिच्या आयुष्यावर फार दूरवर परिणाम होणार असं तिचं तिलाच वाटूं लागलं होतं.

ज्यानं आपल्याला संकटांतून सोडविलं तो दुसरा कोणी नसून, आंबेवाडी·च्या येसाजी जगदाळ्यांचा एकुलता एक मुलगा श्रीरंग होय हें त्या दिवशीं त्याच्याच बोलण्यावरून उघड झाल्याबरोबरच ती दचकली होती. जगदाळ्यांचा श्रीरंग शिकून मोठा झाला आहे, व तो मुंबईकडे असतो येवढं तिनं ऐकलं होतं. त्याला प्रत्यक्ष पाहण्याची संधि तिला कधींच मिळाली नव्हती. तो तिच्या दृष्टीस प्रथम पडत होता तो रात्रीच्या प्रहरीं मोकळ्या रानांत चांदण्याचा जो अगदीं अंधुक असा प्रकाश पडतो त्या प्रकाशांत. परंतु त्या

तशा प्रकाशांतहि उण्यापुऱ्या उंचीची व रेखीव बांध्याची त्याची मूर्ति पाहून, व विशेषतः त्याच्या बोलण्याचा मृदुस्वर ऐकून, आपलं अंतःकरण आपण गमावत आहोंत अशा कल्पनेचे रोमांच तिच्या अंगावर उठले होते. येसू जगदाळयाच्या मुलानं आपल्या मुलीला संकटांतून सोडवून आपल्यावर उपकार केले हें आपल्या बापूंना समजतांच, कृतज्ञता दाखविण्याऐवजीं ते रागावून शिव्या मात्र देतील या विचारानं तिला भयहि वाटलं होतं. या प्रकाराबद्दल एक अवाक्षरहि बापूंच्या जवळ काढायचं नाहीं असं तिनं मनाशीं ठरविलं होतं, व आपल्या मैत्रिणींनाहि कुणाजवळ चुकूनसुद्धां न बोलण्याची शपथ तिनं घातली होती. श्रीरंगानं तिच्या घराद्दाराशीं तिला आणून सोडलं तेव्हां तिच्या कानांत हळूच सांगितल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं तिन्हीसांजा ओढ्यावर जाऊन त्याला भेटल्यावांचून मात्र ती राहिली नव्हती. आणि तिची आई जेव्हां तिला म्हणाली कीं, “आलीच आहेस तर गौरीगणपति झाल्यावर जा, तेव्हां तिनं तें आनंदानं मान्य केलं होतं; आणि रोज तिन्हीसांजाची घटका संकेतस्थळीं श्रीरंगाला भेटण्यांत तिनं घालवली होती.

विसोबाच्या जत्रेनंतर लगेच पुण्यास परत जाण्याऐवजीं दहाबारा दिवस घरीं राहिलेली सोनी पूर्वीच्या सोनीहून अगदीं निराळी होती. श्रीरंगाच्या प्रेमांत ती पुरती सापडली होती; आणि या प्रेमाचे परिणाम काय काय होणार कोण जाणे अशा भीतीची व्यथा तिचं मन सतत सहन करीत होतं.

ती अखेर पुण्यास गेली ती आपलं अंतःकरण श्रीरंगजवळ ठेवून. आणि “सोने, काय वाटेल तें झालं तरी मी तुला माझी करीन” असे जे शब्द ओढ्याच्या कांठीं अंधुक चंद्रप्रकाशांत श्रीरंगानं तिच्या कानांत सांगितले होते त्यांची आठवण बरोबर घेऊन.

× × ×

होतां होतां नवरात्र सुरू झालं.

श्रीरंग मुंबईहून आला होता तो वास्तविक चारसहा दिवस घरीं राहायसाठींच, पण तो अजूनहि मुंबईला परत गेला नव्हता. मुंबईस असतांना तो कॉंग्रेसचा एक निष्ठावंत कार्यकर्ता म्हणून कामगार लोकांच्या चळवळींत सामील असे. स्वतःवर तो कोणतं संकट ओढवून घेईल नियम नाहीं अशी त्याच्या वडिलांना सतत काळजी वाटत असे. त्यामुळें तो मुंबईस परत

जाण्याची घाई करीत नाहीं हें पाहून त्यांना आनंदच झाला. खरोखर कोणत्या ओढीनं तो घरीं राहिला होता त्याची त्यांना कल्पना नव्हती. मनांतली गोष्ट बापाजवळ केव्हां तरी सांगावी लागणार हें श्रीरंग ओळखून होता. पण योग्य संधीची वाट पाहायचं त्यानं ठरवलं होतं. नवरात्र सुरू झालं तेव्हां तो मनाशीं म्हणाला, 'आतां लवकरच दाजींना सांगून टाकूं...'

नवरात्रासाठीं म्हणून सोनी घरीं आली.

तिची प्रकृति बरी नसावी असं तिच्याकडे पाहतांच बापूंना वाटलं. ते मनांत म्हणाले, पोरगी अभ्यासाचा काच फार लावून घेतेसं दिसतंय. केवळ येसू जगदाळयाशीं स्पर्धा करण्यासाठीं मी आपल्या या सोन्यासारख्या मुलीला घरावेगळी ठेवून तिच्या आयुष्याचं मातेरं तर करीत नाहीं ?...

"सोने, वाळलीस ग" असं तिच्या पाठीवर हात फिरवून म्हणतांना त्यांचे डोळे ओले झाले.

सोनीलाहि एकदम हुंदका आला.

आपल्यावर ममता करणाऱ्या या पित्याशीं भांडून झगडून श्रीरंगाच्या स्वाधीन होण्याइतकं सामर्थ्य आणि धैर्य आपल्यांत असेल काय ?...आणि तें नसेल तर प्रेमावांचून शुष्क झालेल्या आयुष्याला आपल्याला तोंड द्यावं लागणार !...

तिच्या डोळयांतून ओघळलेलीं आसवं पाहून बापू अधिकच द्रवले. आपल्या बायकोकडे वळून ते म्हणाले,

"अण्णा वैद्यांना उद्यांच सकाळीं बोलावून आणून सोनूताईची तब्बेत दाखवायची बरं का."

"इश्श! बापू, वैद्यबुवांना कशाला दाखवायला हवं ? इथं आलें, माझ्या प्रेमाचीं माणसं मला आतां भेटतील, मी लवकरच अगदीं गाजरासारखी लाल होईन बघा."

असं म्हणून सोनी जी आंत पळाली ती पुन्हा म्हणून बापाला तोंड दाखवायला बाहेरच्या सोप्यांत आली नाहीं.

ती मागल्या चौकांतल्या माडीवरच्या आपल्या खोलींत गेली आणि तिच्या दक्षिणेकडच्या भिंतींत जी एक झरोकेवजा खिडकी होती तिच्यांतून बाहेर पाहत उभी राहिली.

चोरवाडीच्या सीमेवरचीं शेतं, त्यापलीकडे पावसाळयांत फुगलेल्या पिंडीच्या ओढ्याचं पाणी, ओढ्याच्या दुसऱ्या कांठालगतच्या चढावाच्या माथ्यावरच्या पिंपळाचे शेंडे, आंबेवाडींतल्या घरांचीं पावसानं धुऊन निघालेलीं छपरं—अशा त्या देखाव्यावर तिची दृष्टि विसावली; व तिरंगी निशाण ज्यावर फडफडत होतं अशा तांबड्या कौलाराचा लहानसा भाग झाडांच्या फटींतून दिसतांच तिच्या जीवाला केवढं समाधान झालं! जगदाळयांचं घर होतं तें! तिथें तिचा श्रीरंग होता. तोहि या क्षणीं तिच्याबद्दलच विचार करीत असेल काय? 'नवरात्राला तूं घरीं आलीस कीं, मग तुझ्या बापाकडे सरळ येऊन तुला मागणी घालणार आहे मी. त्यानं होय म्हटलं तर ठीकच. नाहीं तर त्याला कल्पनाहि नसेल असा डाव मी करणार आहे.' असं जें त्यानं मागच्या वेळेस तिला निरोप देतांना म्हटलं होतं तें त्याच्या लक्षांत होतं ना?...तिच्या वडिलांनीं त्याची मागणी मंजूर केली नाहीं तर, तो त्यांची कल्पनाहि नाहीं असा डाव करणार होता म्हणजे काय करणार होता? एखादं भलतं साहस तर त्यानं योजलं नव्हतं? प्रेमासाठीं पुरुष वाटेल तें साहस करतात. तिचा श्रीरंगहि तिच्यासाठीं—

"माझा लाडका श्रीरंग" असा स्वतःशींच उद्‌गार काढून व एक निःश्वास टाकून ती खिडकींतून दूर झाली, व जिना उतरून खालीं जातांना तिनं बेत केला कीं श्रीरंगापासून सारी इडापिडा दूर राहावी म्हणून, खालीं देवघरांत बसविलेल्या घटापुढें हात जोडून आतां प्रार्थना तर करायचीच, पण शिवाय उद्यांपासून रोज सकाळीं आपल्या हातांनीं झेंडूच्या फुलांची माळ करून घटावर बांधायची.

घटावर आठ माळा चढल्या. नवमीच्या दिवशीं माळ बांधतांना सोनीचा हात थरथर कापत होता. तिसरे प्रहरीं श्रीरंग तिच्या घरीं वडिलांकडे येऊन तिला मागणी घालणार होता!

तिची प्रार्थना लवकर संपेना.

आणि रात्रीं तिचं रडणंहि कांहीं केल्या संपेना.

कारण संध्याकाळच्या सुमारास श्रीरंग तिच्या घरीं येऊन दाखल झाला होता. तिच्या वडिलांची गाठ घेऊन त्यानं आपलं मागणं सांगितलं होतं आणि आपल्या मागणीचं समर्थन करण्यासाठीं तो बोलूं लागला होता.

परंतु त्याचं बोलणं एकदम थांबवून तिच्या वडिलांनीं संतापानं ओरडून त्याला शिव्याच द्यायला सुरवात केली होती. चोरवाडीचं पाटील घराणं आणि आंबेवाडीचं जगदाळयाचं घराणं यांमधल्या कित्येक वर्षांच्या वैराचा त्वेष त्यांच्या अंगांत संचरला होता. आणि श्रीरंगाला टाकून बोलतांना त्याच्या जिव्हेला अगदीं हाड उरलं नव्हतं. त्यांनीं श्रीरंगाला जवळजवळ हाकूनच दिलं होतं आणि मग तडक सोनीच्या खोलींत शिरून तिच्यावर असा कांहीं राग काढला होता, कीं त्यांनीं तिला बडविलं कसं नाहीं हेंच आश्चर्य !

यामुळें रात्रीं सोनी अंथरुणावर पडली खरी, पण तिच्या डोळयांतून वाहणाऱ्या अश्रूंना कांहीं केल्या खंड पडेना. संपलंच सारं! आतां कोठून मी श्रीरंगाची होतें, असं मनांत आलं कीं दुःखानं तिचा घसा कोरडा होई व छाती रिकामी झाल्यासारखी वाटे. आशेला एकच जागा तिला उरली होती. श्रीरंग बापूंचा नकार मानून स्वस्थ बसणार नव्हता. साहस करणार होता. पण त्यानं भलतंच कांहीं साहस तर योजलं नसेल, असं मनांत आलं कीं भयानं तिचा थरकाप होई आणि मग तिला वाटे, नकोच हें क़ांहीं. हें प्रेम, जीवाची ही ओढ, ही झटापट, काळजी, भीति, निराशा—अन् त्या निराशेंतहि जगूं पाहणारी हट्टी आशा—कांहींच नको.

दुसऱ्या दिवशीं दसरा आला. आज कित्येक वर्षे आंबेवाडी-चोरवाडीच्या लोकांची दसरा साजरा करण्याची एक विशिष्ट रीत झालेली होती. दुपारीं दोनतीन वाजेपर्यंत लोकांचीं गोडाधोडाचीं जेवणं आटपत, हात धुऊन विडा खाल्ला कीं लहानथोर पुरुषमाणसं हळूहळू अंगावर सणाचीं वस्त्रं चढवूं लागत. कमरेला कोरीं धोतरं कसावीं, अंगांत कोऱ्या पैरणी घालाव्या, डोक्याला ठेवणींतले जुने भारी मंदील, कुणी जरीकांठी रुमाल, कुणी फडांत जिंकलेलीं लाल पागोटीं, तर कुणी कोल्हापुरी थाटाचे रंगीत फेटे बांधावे. गांवांतलं एकूण एक घोडं सजवून शृंगारून तयार झालेलं असे. धंदेवाईक गुरव, गोंधळी, ताशेवाले, शिंगवाले सारेजण आपापलीं वाद्यं घेऊन सज्ज होत. भाला, बरची, बंदूक ज्याच्याजवळ जें हत्यार असेल तें त्यानं बरोबर घ्यायचं असे. अशा थाटाच्या मिरवणुकी दोन्ही गांवांतून निघत असत व दोन कोसावर असलेल्या भवानीच्या माळावर त्यांची भेट होत असे. मग सशाची मोठी हुलडीची शिकार होई. कोणतं गांव जास्त शिकार मिळवतं अशी स्पर्धा लागे. एकाचा ससा दुसऱ्यानं जिंकावा

अशी चुरस लागे आणि अखेर सरशी करणाऱ्या गांवचे लोक वीस-पंचवीस फूट उंचीच्या भाल्याच्या काठीला आपली शिकार टांगून वाद्यं वाजवीत आणि जयघोष करीत थाटानं गांवाकडे परत फिरत!

कधीं चोरवाडीच्या लोकांची सरशी व्हावी, कधीं आंबेवाडीच्या लोकांनीं जिंकावी असा प्रकार चाले. मात्र शिकारीसाठीं केवढीहि चुरस झाली तरी कुणी गैरवर्तन करायचं नाहीं अगर कुणी कुणाची वावगी आगळीक काढायची नाहीं असा संकेत ते भोळेभाबडे लोक बिनतक्रार पाळीत असत. शिलंगणाची शिकार म्हणजे ज्याची वर्षभर उत्सुकतेनं वाट पाहावी आणि ज्याची पुढें वर्षभर परोपरीनं आठवण काढावी असा एक मोठ्या उत्साहाचा समारंभ दोन्हीं गांवचे लोक समजत असत.

पिढ्यान् पिढ्या चालत आलेल्या या क्रमाप्रमाणें आजही चार घटका उन्हं राहिलीं असतांना दोन्ही गांवांतून मिरवणुकी निघाल्या. शिकारींत विजय संपादून परत येण्याची ईर्षा दोन्ही गांवकऱ्यांनीं अर्थातच धरली होती. बापू पाटील नेहमींहूनहि अधिक त्वेषानें आपल्या माणसांना बजावीत होता कीं बेट्यांनो, आंबेवाडीच्या लोकांचं नाक आज आपण ठेचलंच पाहिजे बघा. येसू जगदाळयाच्या पोरानं आपल्या लेकीवर डोळा ठेवण्याचा उद्धटपणा केला याबद्दल त्याच्या मनांत कालपासून जो संताप भडकला होता त्याचं परिमार्जन श्रीरंगाला सरळ तोंडावर शिव्या दिल्या येवढ्यानं झालंसं त्याला वाटत नव्हतं. शिलंगणाची शिकार आपल्या गांवानं साधली, कीं मग ऐनमिरवणुकींत येसू जगदाळयाला अन् त्याच्या पोराला मर्मभेदक शब्दांनीं घायाळ करण्याचा बेत त्यानं मनांतल्या मनांत केला होता.

पण दुर्दैवानं बापू पाटलाचा तो बेत सिद्धीस गेला नाहीं.

त्या दिवशीची शिकार आंबेवाडीच्या लोकांनीं साधली. शिलंगण त्यांनीं जिंकलं!

बापू पाटील मनाशीं भलता चरफडला. परत वाटेनं तो कुणाशींहि एक चकार शब्दहि बोलत नव्हता.

आणि आपल्या घराच्या दाराशीं येतांच घरच्या माणसांकडून त्याला जी बातमी समजली ती ऐकून तर त्याच्या जिवाचा भडकाच उडाला.

श्रीरंगनं घरांत घुसून सोनीला पळवून नेलं होतं!

"कुणी जगदाळयाच्या रंग्यानं!" असा क्रोधाचा उद्‌गार काढून बापू सगळ्यांकडे डोळे फाडून पाहूं लागला. त्याला ती बातमी क्षणभर खरीच वाटेना. कारण शिकारीच्या धावपळींत श्रीरंग असलेला त्यानं पाहिला होता. पण दुसऱ्याच क्षणीं त्याच्या लक्षांत आलं, कीं मिरवणुकी परतल्या तेव्हांपासून श्रीरंग कुठेंहि दिसला नव्हता खराच. आंबेवाडीच्या लोकांची मिरवणूक परतून गांवांत दाखल व्हायला जो अवधि लागला तेवढ्यांत इकडे सटकून त्यानं सोनीला पळवून नेण्याचं पाजी कृत्य केलं असलं पाहिजे.

त्या क्षणीं बापू पाटलाची अवस्था मोठी विलक्षण झाली. गांवकऱ्यांना घेऊन जाऊन येसू जगदाळ्याच्या घरावर हल्ला करावा, श्रीरंगाला बेदम मारून काढावं, सोनीला फरपटत ओढीत आणावं, जगदाळ्याचं घर पेटवून द्यावं अशा बेफाट विचारांचा कल्लोळ त्याच्या डोक्यांत उसळला!

इकडे आंबेवाडीस शिलंगणाची मिरवणूक परत आली ती हर्षोन्मादाच्या कल्लोळांतच. शिकार साधून गेल्या पांच वर्षांचा अपमान आज आंबेवाडीच्या गांवकऱ्यांनीं भरून काढला होता. गांवातल्या घराघराशीं पंचारतीचा थाट विशेष आनंदानं होऊं लागला. येसू जगदाळे दारापाशीं येतांच तिथें वाट पाहत उभ्या असलेल्या श्रीरंगानं बापाला आपण केलेली गोष्ट सांगितली.

"पोरा, काय सांगतोस हें!" असा उद्‌गार म्हाताऱ्यानं काढला.

श्रीरंग हसून म्हणाला, "आजचं शिलंगण साधं सोनं लुटून साजरं केल्यानं माझं समाधान झालं नसतं. मला हें सोनं लुटायचं होतं, तें मीं लुटलं."

"पण आतां पुढें?"

"बापू पाटील काय काय करील तें मी ओळखून आहे. पण त्यासाठीं मीं तयारी करून ठेवली आहे. दाजी, तुम्ही काळजी करूं नका. लवकर आंत चला, अन् सोनीला सांगा, कीं जगदाळ्यांच्या घराची लक्ष्मी तूं लवकरच होशील."

त्या दिवशीं रात्रीं आंबेवाडी व बोरवाडी या गांवच्या लोकांत जी मारामारी झाली ती अभूतपूर्व होती. पण त्या मारामारींत बापू पाटलाचा हेतु सफळ झाला नाहीं. आंबेवाडीच्या लोकांनीं त्यांच्या लोकांची अगदीं दाणादाण उडवून टाकली. शिव्या देत चरफडत परतण्याखेरीज त्याला गत्यंतर उरलं नाहीं.

या प्रकारानंतर त्या दोन गांवांतला शेंकडों वर्षांचा उभा दावा आणखीच तीव्र झाला. बाह्यतः दोन्ही गांवांत शांतता नांदत होती; पण आंतून वैर धुमसत होतं.

मार्गशीर्षांत सोनीचं श्रीरंगाशीं मोठ्या थाटानं लग्न झालं. सोनी आपल्या बापाच्या घराला कायमची मुकली होती, पण त्याची तिला फिकीर नव्हती. तिच्या लाडक्या श्रीरंगाची ती लाडकी लक्ष्मी झाली होती!

* * *

१९४२ चा पावसाळा मोठा झोकांत सुरू झाला. मृगाच्या दुसऱ्या चरणापासूनच जी झोड सुरू झाली ती सतत चार आठवडे चालली होती. शेतजमिनी पाणी पिऊन पिऊन फुगल्या, दूरचे डोंगर गडद जांभळे दिसूं लागले, माळरानावर चांगला हातभर जाडीचा किनखापी हिरवा गालिचा पसरला गेला, पिंडीचा ओढा एखाद्या छोट्या नदीसारखा वाहूं लागला. गेल्या पन्नास वर्षांत काढली नसतील अशीं पिकं यंदा काढण्याचीं स्वप्नं शेतकऱ्यांना पडूं लागलीं.

बापू पाटील मात्र भलतींच भेसूर स्वप्नं मनाशीं रचीत होता. "सोनी जगदाळ्याच्या घरांत गेली, ती मेली असंच मी समजतों." असा निकाल लावल्याप्रमाणें तो वरकांती बोलत असे. तथापि, श्रीरंगानं सोनीला पळवून नेऊन आपलं आणि आपल्या गांवाचं नाक कापलं या विचाराचं शल्य मनांतून अजीबात काढणं त्याला फार कठीण जाई. सोनी सुखांत आहे असं कोणी तिऱ्हाइतानं सांगितलं तर तें त्याला खरं वाटत नसे. श्रीरंग शिकला सवरलेला असेल, पण खेड्यापाड्यांत हिंडून कॉंग्रेसचं काम तो करीत असतो, रिक्रूटभरती करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या डोळ्यांत तो सलत आहे, संस्थानचे अन् ब्रिटिश हद्दींतलेहि पोलीस त्याच्या मागावर सदा आहेत, तुरुंगाची हवा खायला तो केव्हां किती दिवसांसाठीं जाईल नियम नाहीं, इत्यादि गोष्टींचा उल्लेख करून बापू पाटील म्हणे, "असल्या नवऱ्यापासून काय सुख होणार माझ्या लेकीला! दुसऱ्या एखाद्याशीं तिचं लग्न झालं असतं तर एव्हांना आमच्या घरांत तिच्या डोहाळजेवणाचा थाट उडाला असता!" आपल्या मुलांनीं स्वतःचा हेका चालवून जें केलं त्यामुळें त्यांचं कल्याण होणं शक्यच नाहीं असं बाप धरून चालत असतात, व मुलांचं सुख त्यांना दिसलं तरी त्याला सुख म्हणायला त्यांची तयारी नसते. हा सारा अभिमानाचा खेळ

आहे. आणि बापू पाटील तर फारच अभिमानी माणूस होता. उभ्या जन्मांत त्याच्याविरुद्ध कधीं कुणी गेलं नव्हतं; आणि तसं जाण्याचं धाडस ज्या व्यक्तीनं केलं ती त्याची स्वतःची मुलगी होती. सोनीनं प्रथम श्रीरंगाबरोबर लग्न केलं ही गोष्ट नाइलाजानं मान्य करून स्वस्थ बसल्यासारखा तो वरकरणी दिसे. पण त्याच्या मनांतला संतापाचा दाह शमला नव्हता. त्याच्या मनांत कधीं कधीं भयंकर कल्पना उठत. यंदा पिकं अगदीं सोळा आणे होणार या विचारांतून त्याला पहिली कल्पना सुचली असेल तर ती ही, कीं जगदाळया-च्या शेतांत पिकं उभीं राहिलीं म्हणजे तीं सरळ जाळून टाकावीं.

पण बापू पाटलाचे विचार या दिशेनं वाहत होते, तर एकंदर साऱ्याच देशांत आणि संसर्गासंसर्गानं संस्थानच्या या मुलखांतहि निराळ्याच कल्पनांचे वारे वाहूं लागले होते. महायुद्धानं निर्माण केलेली परिस्थिति रोज अधिकाधिक बिकट होत चालली होती, आणि तिचा बिकटपणा खेडेगांवांतल्या सामान्य शेतकऱ्यालाहि बोचावा इतका पसरत चालला होता. आपला खरा मित्र कोण अन् खरा शत्रु कोण हें नीट ठरविण्याची वेळ आली असं अडाणी लोकांनाहि वाटूं लागलं होतं. उंच आभाळांत विजेचा चमचमाट होऊं नये पण क्षितिजाखालीं ती थरथरलेली दिसावी, तद्वत् लोकांच्या अंतःकरणांत कसल्या तरी अनामिक अस्वस्थतेचे स्फुलिंग उठूं लागले होते. या काळांत खऱ्याहि वाटणार नाहींत अशा गोष्टींच्या बातम्या लोक आपापसांत बोलत असत. सातारा जिल्ह्यांतल्या एका खेडेगांवांतला अशिक्षित पण धाडसी असा बाजी घाटगे नांवाचा एक माणूस गांवोगांवीं फिरून ऐक्याचा संदेश सांगतो, त्याला तुरुंगाची पर्वा नाहीं, कुणाची डर नाहीं. तो एकदां बोलूं लागला कीं खेडवळांचा दहा दहा हजारांचा समाज मंत्रमुग्ध करून सोडतो, त्याच्या हाकेसरशीं आजूबाजूचीं खेडीं एकदिलानं उठतील. इत्यादि नवलाच्या गोष्टी बापू पाटलाच्या कानांपर्यंत पोंचल्या होत्या. बाजी घाटग्याचं व्याख्यान ऐकण्याचा योगहि त्याला लवकरच आला होता, आणि तें ऐकून घरीं परत आल्यावर त्याचं मन त्याला म्हणूं लागलं होतं, देशांत हें असं चाललंय् अन् तूं कसले विचार करतो आहेस?— तर जगदाळयावर सूड घेण्याचे! थूः तुझ्या जिनगानीवर!

बापू पाटलाची आषाढीची वारी कधीं चुकली नव्हती. यंदाहि तो पंढरपू-

रला गेला. प्रवासांत वारकरी सोडून इतर लोकांत जिथें जिथें तो मिसळला तिथें तिथें त्याला आढळून आलं, कीं देशांत लवकरच कसलं तरी प्रचंड आंदोलन होणार आहे अशी साऱ्यांची भावना होती. पंढरपूर गांवांत, धर्मशाळेंत, मोटार स्टँडवर, स्टेशनावर, आगगाडींत– ज्या त्या ठिकाणीं पांढरपेशे लोक आणि खालच्या वर्गांतलेहि लोक महात्मा गांधींच्या गोष्टी बोलत होते. मुंबईस कॉंग्रेसची मोठी बैठक भरणार होती आणि मग काय होणार होतं त्याचा नेम नव्हता!

आषाढांतली दुसरी एकादशी उलटली. आणि नंतर तीनच दिवसांनीं बातमी आली, कीं गांधी पकडले गेले!

* * *

नंतरच्या सात आठ दिवसांत आंबेवाडी बोरवाडीच्या आयुष्याचा सारा रंगच पालटला. विसोबाची जत्रा आतां अवघी एका महिन्यावर आली होती. पण गतवर्षीप्रमाणें तिचा थाट उडवून द्यावा असं कुणाच्याहि मनांत येत नव्हतं. कारण उद्यांचा दिवस कशा तऱ्हेचा उगवतो कोण जाणे, असं माणसाला वाटावं अशा तऱ्हेचे गंभीर प्रसंग चहूं बाजूंच्या खालच्या मुलखांत अन् प्रत्यक्ष संस्थानांतहि झपाट्यानं घडूं लागले होते. बाजी घाटग्यावर नुसतं पकड वॉरंटच नव्हतं. सापडेल त्या जागीं त्याला गोळी घालण्याचे हुकूम सुटले होते म्हणे. आणि असं असून तो गांवोगांवीं प्रगट होत होता, व्याख्यानं देत होता.

आणि श्रीरंग सतत त्याच्याबरोबर होता!

आपल्या लाडक्या सोनीनं कुठल्या जळत्या अंगाराचं मंगळसूत्र गळ्यांत बांधलं! असं बापू पाटलाच्या मनांत सारखं येऊं लागलं. परंतु या विचारांत पूर्वीचा संताप, निषेध अगर सूडाची बुद्धि आतां उरली नव्हती. तिची जागा सर्वस्वीं वात्सल्यानं घेतली होती. सोनीला भेटण्याची अगदीं अनावर इच्छा त्याला होऊं लागली.

* * *

शेवटीं कालचक्राचा वर्षाचा फेरा पूर्ण होऊन विसोबाची वार्षिक जत्रा एका एका दिवसावर आली.

आणि त्याच दिवशीं बातमी आली, कीं श्रीरंगाला पकडण्यासाठीं गेल्या सबंध महिनाभर झालेले प्रयत्न फुकट गेल्यामुळें, अखेर येसू जगदाळ्याच्या घरावर सरकारी नोटीस लागली होती. पंधरा दिवसांच्या आंत श्रीरंग आपण होऊन स्वाधीन झाला नाहीं तर त्याच्या बापाचं घरदार, जमीनजुमला, सारी इस्टेट जप्त करण्यांत येणार होती.

ही बातमी कळतांच बापू पाटील रातोरात एकटाच येसू जगदाळ्याच्या घरीं जायला निघाला.

जवळ जवळ दहा महिन्यांनीं तो आपल्या लेकीची भेट घेणार होता.

पण आतां तो तिची निर्भर्त्सना करणार नव्हता. ती दुःखानं व्याकुळ झालेली असेल, तिला आपण पोटाशीं धरून धीर देऊं, असं तो मनाशीं म्हणत होता. येसू जगदाळ्यालाहि तो सांगणार होता, कीं 'तुमची सारी इस्टेट गेली तरी फिकीर करूं नका. माझं जें कांहीं आहे तें माझ्या लेकीचं आणि श्रीरंगाचंच आहे.' झाल्या गेल्या गोष्टी विसरून येसू जगदाळ्याला आणि विशेषतः आपल्या लेकीला धीर द्यायचा ही एकच कल्पना बापूच्या मनांत साऱ्या वाटभर घोळत होती. त्याला वाटत होतं, आपण जाऊं तों संकटानं खचलेला येसू जगदाळे अन् गुडघ्यांत मान घालून रडणारी सोनी आपल्याला दिसेल.

आणि त्यामुळें जगदाळ्याच्या घराचा पुढचा चौक ओलांडून तो सोप्यावर चढला त्याबरोबर त्याला विलक्षण आश्चर्य वाटलं! दुःख, चिंता, निराशा, भीति यांपैकीं एकहि गोष्ट तिथल्या वातावरणांत त्याला दिसली नाहीं.

सोनी सोप्याच्या दारांत उभी होती. बापाला पाहतांच ती विलक्षण चकित झाली. पण लगेच ती हसून म्हणाली,

"बापू—"

तिला पुढें बोलवेना. बापू पाटलाचे दोन्ही हात पसरले गेले व सोनी पुढें सरकून त्याच्या कुशींत शिरली.

"सोने, धीर धर. दुःख आवर."

आंसवांनीं भरलेली आपली दृष्टि वर करून सोनीनं विचारलं,

"दुःख! मला कसलं दुःख झालं आहे, बापू!"

"तुला संसारसुख मिळालं नाहीं आणि आतां तर—"

" हें काय बोलतां, बापू ? मला जें सुख मिळालं तें फार थोड्यांच्या वाट्याला येत असेल."

बापू पाटलानं लेकीच्या मुद्रेकडे निरखून पाहिलं. होय, खरोखरच असंतोषाची अगर पश्चात्तापाची छाया त्या तिच्या मुद्रेवर बिलकुल दिसत नव्हती. त्यानं हलकेच विचारलं,

" पण आतां श्रीरंग कसा भेटणार तुला ?–"

" त्यांच्या भेटीची मला घाई नाहीं. मी त्यांची लाडकी लक्ष्मी खरी; पण ते माझे एकटीचे नाहींत. त्यांच्यावर ज्यांचा हक्क आहे त्यांच्या कल्याणासाठीं ते माझ्यापासून दूर गेले आहेत. श्रीरंगसारख्याची बायको होणं सोपं नाहीं. पण ती अवघड गोष्ट मी आतां शिकलें आहे, बापू. आज ना उद्यां माझे श्रीरंग मला भेटतील. आणि कदाचित् कांहीं अमंगल झालं तरी आपली गोड आठवण माझ्याजवळ ठेवून ते गेले आहेत..."

तिच्या त्या शब्दांचा अर्थ लक्षांत येतांच बापू पाटलाला एकदम गहिंवर आला. तो कांहीं बोलणार होता इतक्यांत सोनी म्हणाली,

" अन् बापू, माझ्यावरचा सारा राग विसरून तुम्ही आज मला भेटलांत तें कुणाच्या किमयेनं ? श्रीरंगांच्याच ना ! तुम्ही मला परत मिळालांत ही केवढी आनंदाची गोष्ट ! मी फार फार सुखांत आहे, बापू. श्रीरंगाची लाडकी लक्ष्मी सुखांत नसेल अशी शंका तरी कशी आली तुम्हांला ?..."

ती आतां मोठ्यांदा हसली, व मग एकदम कसली तरी आठवण होऊन विचारल्याप्रमाणें तिनं प्रश्न केला,

" आई बरी आहे ना ?"

बापू पाटलानं मान हालविली.

सोनी म्हणाली, " तिला घेऊन या उद्यां."

बापू पाटील हसला व म्हणाला,

" होय, तुला बाळंतपणाला न्यायसाठीं म्हणून तिला घेऊन मी उद्यां येतों."

तें ऐकतांच सोनीच्या चर्येवर हास्य दिसलं. जगांत कसलेहि उत्पात झाले आणि केवढ्यालाहि क्रांती झाल्या तरी पोटांत नव्या जगाचा गर्भ धारण करणाऱ्या स्त्रीच्या चर्येवर जें सतत दिसेल असं मंगल हास्य तें होतं.

—झंकार, दिवाळी-अंक, १९४२.

---

## भाग्यचिन्ह ! : : २

स्टेशनच्याबाहेर जयवंतरावांनी पाऊल टाकतांच समोर रांगेत उभ्या असलेल्या टांगेवाल्यांनी "टांगा देऊं का साहेब !" असा एकच ओरडा केला; आणि बरोबरच्या हमालानं "कुठल्या टांग्यांत सामान ठेवूं साहेब !" असं जेव्हा विचारलं तेव्हा "ठेव कुठल्या तरी..." असं जें तुटक उत्तर जयवंतरावांनी दिलं त्या उत्तरांत जितका त्रासिकपणा होता तितकीच त्यांना मनांतल्या मनांत त्या क्षणीं वाटलेली मौजहि व्यक्त झाली होती.

त्रासिकपणा अशासाठी, की काल मुंबईहून दुपारीं तीन वाजतां ते निघाले होते ते जवळजवळ वीस तासांच्या अत्यंत तापदायक प्रवासानंतर कोल्हापुरांत दाखल होत होते. मुंबईपासून पुण्यापर्यंतचा प्रवास तर त्यांना उभं राहूनच करावा लागला होता; आणि पुढं कोल्हापुरच्या डब्यांत अगदी हातघाईचं युद्ध करून त्यांनी कसंबसं टेकण्यापुरती लाकडी बाकाची दहा इंच जागा ज़री मिळविली होती तरी तें सुखस्थान टिकवून धरण्यांतच त्यांची सबंध रात्र गेली होती. मिरजेनंतरच्या दीड तासाच्या प्रवासांत मात्र जरा हातपाय पसरून डुलक्या घेणं त्यांना शक्य झालं होतं; परंतु उपाशी पोटीं मिळालेल्या त्या

अपुऱ्या अन् अर्धवट झोपेमुळं हुशारी वाटण्याऐवजी त्यांना अधिकच शिणल्या-सारखं मात्र झालं होतं. उन्हाळयांत मुंबई शहर भरारा खाली होऊं लागलं, आणि हजार दोन हजार लोक रोज कोकणपट्टीकडे धाव घेऊं लागले, तेव्हाचे हाल ज्यांनी अनुभविले असतील त्यांनाच जयवंतरावांच्या या वेगळ्या मनःस्थितीची थोडीबहुत खरी कल्पना करतां येईल. कुठल्याहि एका टांग्यांत सामान टाक म्हणून त्यांनी हमालाला सांगितलं त्यांतला खरा अभिप्राय असा होता, की या प्रवासानं अर्धमेला झालों आहे बाबा, केव्हा एकदा घर गाठीन अन् चार घास खाऊन अंथरुणावर पडेन असं झालंय् मला! जयवंत-रावांचं ते त्रासिक उत्तर ऐकून अथवा त्यांची तारवटलेली, कपाळाला आठ्या घातलेली मुद्रा पाहून हमालाला आश्चर्य वाटलं नाही. आताशा मुंबईहून आलेले असे सारेच उतारू चिडचिडलेले अन् डोळे लाल झालेले तो रोज शेकड्यानं पाहत होता.

मात्र 'टाक कुठल्याहि टांग्यांत सामान' असं हमालाला सांगतांना मनांतल्या मनांत कसली तरी मौज वाटल्याप्रमाणं जयवंतरावांची मुद्रा जरा खुलली होती यांत संशय नाही. याचं पहिलं कारण असं, की एक प्रतिष्ठित उतारू दिसल्या-बरोबर पांचपंचवीस टांगेवाल्यांनी हात वर करून "या साहेब, आपला टांगा आहे" अशा हाका घालाव्या ही गोष्ट त्यांना विनोदपूर्ण वाटली होती. आणि शिवाय कोल्हापूरच्या रेल्वे स्टेशनच्या पुढच्या प्रशस्त आवारांत पाऊल टाकतांच घाटमाथ्यावरच्या मोकळ्या तब्येतदार वाऱ्याचा स्पर्श अन् आजूबाजूस दिसणारं दृश्य त्यांना मोठं प्रसन्न वाटलं होतं. टांग्याला जोडलेली उंचनिंच भरमक्कम घोडीं, टांगेवाल्यांचे फेटे, चहूबाजूंच्या इमारतींचीं छपरं, त्यांत मधून-मधून विखुरलेले झाडांचे शेंडे आणि अगदी दूर अंतरावरचे डोंगरांचे काळे-तांबडे उन्हांत तळपणारे माथे— या एकंदर देखाव्यानं मनाचा शीण एकदम नाहीसा होतो असा जयवंतरावांना कोल्हापूरच्या स्टेशनवर उतरतांना प्रत्येक वेळेस अनुभव आला होता.

आजहि तोच अनुभव त्यांना आला आणि ते एका टांग्यांत बसले. टांगा भरधाव निघाला तेव्हा प्रवासाच्या शिणाचा त्यांना जवळजवळ विसर पडला. डांबरी रस्त्यावरच्या पाऊल पाऊल खोल खड्डयांमुळं टांगा सारखा हिंदकळत होता व त्यांचं अंग घुसळून निघत होतं तरी कोल्हापुरांत राज्यव्यवस्थेप्रमाणं

रस्त्यांची देखील फार सुधारणा व्हायला हवी आहे या विचारापेक्षा, आता आपण घरीं पोचलों की आपलं स्वागत कसं होईल याचेच विचार जयवंतराव मनाशीं करूं लागले.

* * *

उन्हाळयाच्या प्रारंभीं शत्रूचा हल्ला होणार अशा भयानं मुंबई हालली तेव्हा तिथलीं जीं शेकडो मध्यम वर्गीय साधारण सुखवस्तु कुटंबं कोल्हापुरांत येऊन दाखल झालीं आणि मिळेल ती जागा घरमालक मागेल त्या भाड्यानं घेऊन राहिलीं, त्यापैकी जयवंतरावांचं कुटुंब होतं. बायकामुलांना मुंबईबाहेर पाठवून देण्याची मुंबईत एकच साथ पसरली तेव्हा जयवंतरावांनी कोल्हापूरच्या आपल्या एका स्नेह्याला तार करून दरमहा वीस रुपये भाड्याची एक जागा मिळवली होती आणि आपलं बिऱ्हाड त्यांनी कोल्हापुरास आणलं होतं. त्यांना स्वतःला नोकरीनिमित्त मुंबईस राहणं भागच होतं. परंतु पंधरावीस दिवसांनी ते आपल्या बायकामुलांना भेटण्यासाठी कोल्हापूरची चक्कर टाकीत. तो प्रवास त्यांना अगदी नकोसा होई; तथापि दोनतीन आठवड्यांनंतर आपल्या बायकामुलांची भेट घेतल्यानं होणारा आनंद विशेष असे. प्रवासाचा ताप झाला तरी त्या आनंदांत त्याचा विसर पडे.

आजहि घर जसजसं जवळ येऊं लागलं तसतसं आपण पावणेतीनशें मैलांचा कठीण प्रवास करून आलों याचं जयवंतरावांना भानहि उरलं नाही. आपण घरापुढं दाखल होतांच आंतून कोणकोण धावत ओरडत पुढं येईल त्याचींच चित्रं ते मोठ्या खुषींत मनाशीं काढीत होते.

त्यांचं कुटुंब फारसं मोठं नव्हतं. त्यांची पत्नी, सगळयांत थोरली वीस वर्षांची मुलगी कुसुम, तिच्या खालच्या तीन मुली आणि अगदी नवसासायासांनी शेवटीं झालेला आता चार वर्षांचा असलेला मुलगा आनंद. जयवंतरावांची पत्नी बरीचशी नाजुक प्रकृतीची व कर्तबगारीच्या दृष्टीनंहि जरा दुबळीच होती. कुसुम मात्र हुशार, निकोप प्रकृतीची व वाटेल ती जबाबदारी संभाळण्यास सदा तत्पर अशी होती. या लेकीवर जयवंतरावांचा पहिल्यापासूनच विशेष जीव होता व ती मोठी झाली व कॉलेजांत जाऊं लागली त्यानंतर तर तिचं आणि जयवंतरावांचं विशेष रहस्य उत्पन्न झालं होतं. संसारांतल्या गोष्टींची चर्चा पत्नीशीं करण्याऐवजी ते कुसुमशींच करीत.

ती त्यांना एखाद्या थोरल्या मुलासारखी वाटे. कोल्हापुरास त्यांनी बिऱ्हाड केलं ते देखील कुसुमवर विसंबूनच. अर्थात् आज आता घराकडे येतांना टांग्यांत जयवंतराव विचार करीत होते ते मुख्यतः तिच्याबद्दलच. पत्नी आणि धाकटीं मुलं भेटल्यानं त्यांना आनंद अर्थातच होणार होता; तथापि ते विशेष उत्सुक होते ते कुसुमच्या भेटीसाठी. हर्षानं उड्या मारीत पुढं येणाऱ्या धाकट्या भावंडांना आवरून दारांत उभी राहिलेली ती आपणाला दिसेल व हसत विचारील,

" हें काय दादा, गाडी इतक्या उशिरा आली आज ?"

तिचं तें हास्य दिसलं अन् शब्द ऐकले कीं आपला थकलेला जीव अगदीं ताजातवाना होईल याविषयीं त्याना खात्री होती.

ज्या रस्त्याला जयवंतरावांचं बिऱ्हाड होतं त्याच्या कोपऱ्यावर टांगा वळला त्याबरोबर त्यांनीं उत्सुकतेनं घराच्या दाराकडे दृष्टि टाकली. प्रथम त्यांना तिथं कुणीच दिसलं नाहीं; परंतु दुसऱ्याच क्षणीं कुसुम त्यांच्या दृष्टीस पडली. मात्र ती एकटी नव्हती अगर तिच्याबरोबर तिच्या भावंडांपैकीं कुणी नव्हतं. पंचविशीच्या सुमाराचा एक तरुण तिच्याबरोबर होता. ती व तो मिळून कुठं तरी बाहेर निघालीं असावींत अशा आविर्भावानं तीं दोघं रस्त्यालगतच्या तीन पायऱ्या उतरत होतीं.

त्या तरुण मुलाला जयवंतरावांनी आजपर्यंतच्या कोल्हापूरच्या पांचसहा खेपांत कधी पाहिलं नव्हतं. तो कोण असावा याविषयीं ते तर्क करूं लागले.

परंतु इतक्यांत त्यांचा टांगा घरापुढं थांबला आणि अर्धवट स्वगत आणि अर्धवट त्या तरुणाला उद्देशून कुसुम उद्गारली,

" अय्या, दादा आले की !"

दाराशीं टांगा थांबलेला पाहतांच आंतून मुलं धावतओरडत आलीं, टांगेवाल्यानं खाली उतरून सामान काढलं आणि कुसुमनं पुढं होऊन दादांची छत्री व रेनकोट उचलून हातीं घेतला. त्या गडबडींत त्या तरुणाकडे सगळ्यांचं दुर्लक्ष झालं. तो रस्त्यालगत तसाच उभा राहिला. कुसुमच्या घरच्या मंडळींत आपण मिसळूं शकत नाही याची गंमत वाटल्याप्रमाणं तो स्वतःशीं हसत होता. परंतु हा वेगळेपणा त्याला एक मिनिट दोन मिनिटंच सहन करावा लागला असेल. कारण स्वतः जयवंतराव जरी त्याच्याकडे फक्त एक हास्य

टाकून आपल्या दोन्ही धाकट्या मुलींचे हात धरून आंत गेले तरी कुसुम त्याला म्हणाली,

" आंत चला ना. तुमची अन् दादांची ओळख करून देतें."

त्यानं तिच्याकडे पाहून हास्य केलं. 'एका हातांत छत्री आणि रेनकोट धरण्यासाठीं दुसरा हात आडवा केलेला अशा थाटांत तूं मोठी चांगली दिसतेस!' असं तो आता म्हणणार हें त्याची नजर पाहतांच कुसुमच्या लक्षांत आलं. तुम्ही काय म्हणणार तें मीं ओळखलं अशा अभिप्रायाचा कटाक्ष झट्कन् त्याच्याकडे टाकून ती पुन्हा म्हणाली,

" या ना आंत. दादांशीं थोडंसं बोला, चहा घ्या आणि मग चला."

तो मग तिच्या मागोमाग घरांत शिरला.

* * *

दुपारीं जेवण झाल्यावर जयवंतराव आणि कुसुम दोघंच पुढच्या खोलींत बोलत बसलीं तेव्हां प्रथम त्यांनीं कोल्हापूरची हालहवाल विचारून घेतली. सबंध उन्हाळ्यांत पाण्याचे भयंकर हाल झाले होते ते आता संपले होते. आठ दिवसांपूर्वीपासून चावीला रोज चार तास पाणी येऊं लागलं होतं. युद्धजन्य परिस्थितीमुळंच चोराचिलटांचा उपद्रव होणार या भीतीनं पुण्यांत ज्याप्रमाणं लोकांनी गस्त सुरू केली होती, तसा उपक्रम कोल्हापुरांतहि कांही लोकांनी करून पाहिला होता; परंतु सरकारनं तो बंद केला होता. कुसुमनं कॉलेजांत नांव दाखल केलं होतं आणि मुंबईच्या कॉलेजांच्या मानानं इथलं कॉलेज जरा लहान वाटलं तरी, इथलं शिक्षण आणि एकंदर वातावरण हीं मुंबईपेक्षाहि अधिक रमून जाण्यासारखीं तिला वाटलीं होतीं. ती कॉलेजांतल्या गोष्टी सांगत होती त्या ऐकतां ऐकतां जयवंतरावांनी तिला मधेच विचारलं,

" सकाळीं तूं ज्यांची ओळख करून दिलीस ते इथल्या कॉलेजांतच का आहेत?"

कुसुम म्हणाली, " कोण अच्युतराव ना?"

" हो."

" ते यंदाच इथल्या कॉलेजांतून एम्. ए. झाले."

" मग आता काय करतात?"

" इथल्या एका शाळेंत मास्तर आहेत. आपली मंदा आणि शकू ज्या शाळेंत आहेत ना, त्याच शाळेंत."

" तुझी त्यांची ओळख कशी झाली ? "

" इथल्या विद्यार्थिसंघाचे ते अध्यक्ष आहेत."

" तूं संघांत आहेस वाटतं ! हें नवीनच दिसतं आहे. मुंबईस असतांना तूं असल्या भानगडींत कधी पडली नव्हतीस."

" याला भानगड म्हणतां होय दादा तुम्ही ! "

" तसं नव्हे ग. पण—"

कुसुम म्हणाली, " मुंबईचीं कॉलेजं म्हणजे एखाद्या कारखान्याच्या पसाऱ्यासारखीं वाटतात. इथं तसं वाटत नाही. मुलांमुलींची संख्या थोडी असल्यामुळं आपलेपणा चटकन् उत्पन्न होतो आणि सगळ्या गोष्टींत लक्ष घालावंसं वाटतं. इथला विद्यार्थिसंघ चांगला संघटित आहे आणि अच्युतरावांनी संघाच्या कामांत विशेष शिस्त अन् चैतन्य उत्पन्न केलं आहे. फार हुशार आहेत ते. बोलतात असं सुंदर, की तासन्तास ऐकत राहावं. लिहितातहि तितकंच छान. त्यांचे लेख जर तुम्हीं वाचलेत दादा—"

असं म्हणून कुसुम झटकन् उठली अन् एका शेल्फवरची छोटीशी फाईल काढून ती तिनं आपल्या वडिलांच्यापुढं ठेवली.

" हे लेख वाचून पाहा दादा. यांत एक माझाहि लेख आहे."

" होय ! अरे वा ! " असं म्हणून जयवंतरावांनी ती फाईल उघडली.

" तंवर मी चहा करतें हं दादा." असं म्हणून कुसुम आंत पळाली.

जयवंतरावांनी लेख वाचण्याची विशेष तसदी घेतली नाही. ती न घेतांच बऱ्याच गोष्टी त्यांच्या लक्षांत आल्या होत्या.

मात्र त्या त्यांच्या लक्षांत आल्या याचा अर्थ त्यांना त्या वावग्या वाटल्या असा मुळीच नव्हे. कारण वत्सल पित्याला लेकीच्या हिताची काळजी असावी तशी त्यांना कुसुमची होती हें जसं खरं, तसंच कुसुम कोणतीहि वावगी गोष्ट करणार नाही हें त्यांना पक्कं माहीत होतं. देशांतली झपाट्यानं बदलणारी परिस्थिति लक्षांत घेतां, राजकारणांत लक्ष घातल्यानं व अच्युतविषयीच्या आकर्षणानं कुसुम स्वतःवर संकट ओढवून घेईल की काय अशी भीति मात्र त्यांना वाटली. पण त्यांनी मनाशीं विचार केला, आपल्यांत आणि तरुण

पिढींत असं हें अंतर आता पडायचंच. आपण आपल्या मनाला व्यर्थ चिंता लावून घेण्यांत कांही अर्थ नाही.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळच्या गाडीनं ते मुंबईस परत जायला निघाले तेव्हा कुसुम त्यांच्याबरोबर स्टेशनवर गेली. गाडी सुटण्याच्या सुमारास अच्युतहि सायकलवरून आला. ते कुसुमला म्हणाले,

" संभाळून राहा हं."

आणि जणू तिच्या वर्तनाची जबाबदारी अच्युतवर होती अशा अभिप्रायानं त्यांनीं चटकन् त्याच्याकडे दृष्टि वळवून म्हटलं,

" काय अच्युतराव, मी हिला संभाळून राहायला सांगतों आहें तें बरोबर आहे ना ? "

अच्युतनं फक्त हसून मान हालविली.

गाडी सुटली व जयवंतराव आपल्या मार्गाला लागले.

* * *

कॉलेजांत यंदा अभ्यास, निवडणुकी, खेळ, व्याख्यानं, इतर कार्यक्रम सगळ्याच गोष्टींना विशेष भर आला होता. इंग्रजी, मराठी इत्यादि विषयांचीं जुनीं मंडळं तर यंदा जोरांत चालणार होतींच; पण शिवाय दर आठ दिवसांनीं एक नवं मंडळ स्थापन होत होतं अन् त्याच्या आगामी कार्यक्रमाच्या जाहिराती फडकलेल्या दिसत होत्या.

जुलै महिन्याचे दिवस मोठ्या दंगलींत गेले. अखेर एकदां शनिवारीं रात्रीं संगीत समितीतर्फें विविध कार्यक्रम झाला–तो तर फारच यशस्वी झाला. या कार्यक्रमांत कुसुमनं दोन गाणीं म्हणून दाखवून सुवर्णपदक मिळविलं. एकंदर कार्यक्रम आटपायला जवळजवळ एक वाजला. कार्यक्रमाला अच्युत मुद्दाम आला होता. कुसुमला घरीं पोंचविण्यासाठीं तो तिच्याबरोबर निघाला. खासबागेकडच्या रस्त्यानं तीं दोघं जाऊं लागलीं तेव्हां आजूबाजूस कोणी नव्हतं. उत्तर रात्रीची शांतता चहूंकडे पसरली होती; आणि पुष्कळच उशिरा उगवलेला चंद्र पूर्वेकडे कांहींसा भीतभीतच वर सरकतांना दिसत होता.

अच्युत बराच वेळ अगदी स्तब्धपणानं पाऊलं टाकीत चालला होता म्हणून कुसुमनं विचारलं,

" बोलत कां नाहीस ?... आजच्या कार्यक्रमाला मोठी मजा आली, नाही ?... यंदा कॉलेजच्या वातावरणांत उत्साहाचं अगदी वारं शिरलं आहे..."

अच्युत हलकेच म्हणाला, " होय, खरं आहे. पण हें कसलं लक्षण आहे कुणास ठाऊक ! "

" असं कां म्हणतोस ? "

" विझण्यापूर्वी दिवा मोठा व्हावा तसं वाटतं आहे हें सारं मला. कॉलेजच्या मोठ्या हॉलमधला विजेच्या दिव्यांचा तो झगझगाट पाहतांना अन् गाणीं, नकला अन् श्रोत्यांच्या टाळ्या ऐकतांना माझ्या मनांत सारखं येत होतं, आणखी पंधरा दिवसांनी काय होणार आहे कुणास ठाऊक !... "

तो हलके बोलूं लागला म्हणून कुसुम त्याला अगदीं खेटून पावलं टाकूं लागली. न कळत दोघांचे हात एकमेकांत गुंतले. अच्युत म्हणाला,

" गांधींनी 'हरिजन' पत्रांत कसल्या लेखांचा धडाका सुरू केला आहे, वाचतेस ना रोज ? सात तारखेला ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या बैठकींत जो निर्णय होईल त्यावर सारं भवितव्य अवलंबून आहे. आजची शांतता आणि विद्यार्थ्यांच्या जगांतला आनंद अन् उत्साह पाहून वाटतं, हें सारं कशाचं पूर्वचिन्ह आहे कुणास ठाऊक !... "

कुसुमनं त्याचा हात अधिकच घट्ट धरला अन् तीं दोघं पुन्हा अगदीं स्तब्ध चालूं लागलीं.

* * *

शनिवारीं कॉलेज सकाळचं होतं. दुसरा तास संपल्यावर विद्यार्थिनींच्या खोलींत कुसुम बसली होती आणि त्या लहानशा मधल्या सुटींत लायब्ररीकडे जाऊन एक पुस्तक आणण्याचा विचार करीत होती तोंच कॉलेजचा शिपाई तिच्याकडे आला आणि म्हणाला,

" साहेबांच्या खोलींत आपल्याला भेटायसाठी कुणीसे आले आहेत. साहेबांनी आपल्याला बोलावलं आहे."

आपल्याकडे कोण आलं असावं असं आश्चर्य करीत कुसुम शिपायाच्या मागोमाग गेली. प्रिन्सिपलच्या खोलींत तिनं प्रवेश केला तों अच्युत प्रिन्सिपलशीं बोलत बसलेला तिच्या दृष्टीस पडला. 'हात्तिच्या ! मला वाटलं कोण

आलं आहे!' असा उद्गार तिच्या अगदी ओठांशीं आला. पण आपण प्रिन्सिपलच्या खोलींत आहोंत हें तितक्यांत तिच्या लक्षांत आलं आणि तिनं तो उद्गार बाहेर पडूं दिला नाही. कदाचित् तो अभिप्राय तिनं आपल्या नजरेंत दर्शविला असता; परंतु तसंहि तिनं केलं नाही. कारण ती खोलींत आलेली दिसतांच अच्युतनं मान वळवून तिच्याकडे पाहिलं तेव्हा त्यानं हास्य केलं नाहीच; पण उलट त्याची मुद्रा अतिशय गंभीर आणि केविलवाणी दिसली. एखाद्या असहाय बालकासारखा तो त्या क्षणीं तिला भासला. जणू कसल्या तरी जबरदस्त दुःखाच्या प्रहारानं तो गांगरून गेला होता. आणि सांत्वनासाठी व धीरासाठी तिच्याकडे तो पाहत होता. तिनं तेवढ्यांत चट्कन् प्रिन्सिपलकडे पाहिलं तों त्यांचीहि नेहमीची हसरी मुद्रा गंभीर झालेली तिला दिसली.

या प्रकाराचा अर्थ न कळल्यामुळं ती कांहीं न बोलतां क्षणभर उभी राहिली. अच्युतनं खिशांतून एक तारेचा गुलाबी कागद काढला व तिच्या हातीं दिला. तारेंत सातआठच शब्द होते ते कुसुमनं झट्कन् वाचले आणि त्या आठच शब्दांत जी बातमी आली होती तिचा भयंकरपणा लक्षांत येतांच तिच्या डोळयांपुढे एकदम गडद अंधार क्षणभर पसरून गेला! ती अंधारी गेली तरी प्रिन्सिपल आणि अच्युत यांच्या आकृति अगदी अस्पष्ट आणि अंतराळांत वाकड्यातिकड्या लोंबत असल्यासारख्या तिला दिसल्या; आणि हातांत धरलेल्या गुलाबी कागदावरचीं काळया पेन्सिलीचीं अक्षरं एकमेकांत गुंतलेल्या मोठमोठ्या दोरखंडाच्या वेटोळयांप्रमाणं तिला भासलीं.

ती मट्कन् खुर्चींत बसली. तिनं डोळे मिटले नाहीत; परंतु अंगावर येत असलेली मूर्च्छा घालविण्यासाठी तिनं आंतल्या आंत अगदीं कराराचा प्रयत्न केला. दुसऱ्या क्षणीं तिला जरा बरं वाटलं. तारेच्या कागदावरील मजकुराकडे तिनं पुन्हा दृष्टि टाकली—

"लेफ्टनंट विनायक देसाई वीस जुलै रोजीं लढाईत मारलां गेला..."

तिनं अच्युतकडे सहज दृष्टि वळवली. तों त्याच क्षणीं तिच्या मनांत आलं— कॉंग्रेसचा आदेश न मानतां आपल्या भावानं सैन्यांत शिरावं हें अच्युतला अगदीं नापसंत असलं तरी, त्याच्या पराक्रमाविषयी त्याला फार अभिमान होता आणि एकुलता एक भाऊ म्हणून विनायकवर त्याची ममता

तर फार होती.... साताऱ्यास एकट्याच राहाणाऱ्या आपल्या म्हाताऱ्या आईचं सांत्वन हा अच्युत आता कसं करणार आहे ?...

या कल्पना तिला अगदी असह्य झाल्या आणि तिनं आवरण्यापूर्वीच तिच्या डोळ्यांतून अश्रु खळकन् ओघळले.

अच्युत उठला न तिला म्हणाला,

" चल, आपण माझ्या खोलीवर जाऊं. मला बाराच्या मोटारनं साताऱ्याला गेलं पाहिजे."

* * *

खोलींत गेल्यावर इतका वेळ आवरून धरलेल्या दुःखाला अच्युतनं वाट दिली.

कांही वेळ तो अगदी स्तब्ध राहून आसवं गाळीत होता व त्याचे अश्रु डोळ्यांवरच टिपीत कुसुम पुनः पुन्हा " असं काय करतोस ? मन आवर." एवढाच उद्गार कसाबसा काढीत स्वतः त्याच्याहीपेक्षां जास्त रडत होती. पुरुषाला हुंदके देऊन रडतांना ती प्रथमच पाहत होती !

थोड्या वेळानं अच्युतनं दोन्ही हातांनी आपले डोळे अगदी निपटून पुसले, सारं दुःख झटकल्याप्रमाणं मान हालविली आणि तो म्हणाला,

" म्हातारीला फार मोठा धक्का बसणार आहे हा !..."

गेल्या तीन महिन्यांत कुसुम अच्युतच्या अगदी निकट सहवासांत आली होती तरी त्याच्या घरच्या हकीगती तिला फारशा माहीत नव्हत्या. अच्युतच्या तोंडून त्या तिला आत्ता प्रथमच कळत होत्या.

अच्युतचे वडील साधे प्राथमिक शाळेतले मास्तर होते. ते वारले तेव्हा अच्युत पंधरा वर्षांचा आणि विनायक बारा वर्षांचा होता. चिमणपुऱ्यांतल्या एका लहानशा घरापलीकडे त्यांनी कसलीहि इस्टेट मागं ठेवली नव्हती. परंतु पितृहीन झालेल्या दोन्ही मुलांनी विद्याभ्यास उत्तम करून नशीब काढलं होतं आणि वैधव्याचं दुःख आईला विसरायला लावलं होतं. दोन वर्षांपूर्वी सैन्यांत दाखल होण्याची इच्छा विनायकनं बोलून दाखविली तेव्हा त्याच्या आईनं अगदी जोरानं मोडता घातला होता. अच्युतनंहि विनायकला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला होता; मात्र तो निराळया कारणासाठी. तथापि अच्युतचा विरोध विनायकाला पटला नव्हता. तो शेवटीं त्याला म्हणाला होता,

" हें बघ अच्युत, या प्रश्नाकडे तूं कोणत्या दृष्टीनं पाहतोस तें मला माहीत आहे. परंतु या बाबतींत तूं जी विचारसरणी पत्करलेली आहेस ती मला पटत नाही. या बाबतींत तुझ्यामाझ्या विचारांत पहिल्यापासून फरक आहे. अन् ज्याला कांही उपाय नाही असा तो फरक आहे. आजच्या संग्रामाचा फायदा घेऊन सैन्यांत शिरावं असं समजणाऱ्या आम्हा लोकांची इच्छा आणि अपेक्षा अशी, की असं वागल्यानं देशाचं स्वातंत्र्य आम्हीं जवळ आणूं. तुम्ही लोक म्हणतां त्याप्रमाणं कदाचित् आम्ही स्वतःची फसगत करून घेत असूं; परंतु असाहि संभव आहे, की हें युद्ध संपून आम्ही परत येऊं तेव्हा आम्हां शस्त्रसिद्ध शिपायांच्या शब्दांचा कुणी अवमान करूं शकणार नाही. आणि आमची मायभूमि स्वतंत्र मानली गेलीच पाहिजे ही मागणी पुरी करून घेण्याची ताकद आमच्यांत आलेली असेल..."

आणि आता विनायक रणांगणावरून परत येण्याऐवजी निराळ्याच वाटेनं कायमचा गेला होता! आणि इकडे देशांतील परिस्थिति तर झपाट्यानं बदलत होती—आणखी बदलणार अशीं चिन्हं दिसत होतीं.

बोलतां बोलतां अच्युत कुसुमकडे पाहत म्हणाला,

" विनायकला मरण आलं याचं दुःख तर वाटतंच, परंतु त्याची वाट चुकली होती याचं मला अधिक दुःख होतं. आणि त्याहूनहि अधिक दुःख वाटतं तें या कल्पनेचं, की माझ्या आईला आता मी एकटाच मुलगा राहिलों..."

त्यानं कपाळावर डावा हात टेकला आणि डोळे क्षणभर मिटून धरले. आता त्याच्या डोळ्यांत अश्रु उरले नव्हते.

कुसुमनं विचारलं, " मी येऊं काय तुझ्याबरोबर साताऱ्याला ? "

अच्युतनं फक्त मान हालविली.

* * *

ता. ९ ऑगस्टला रविवार होता.

दर रविवारच्या पद्धतीप्रमाणं कुसुमनं दुपारच्या जेवणानंतर मंदा आणि शकू यांचे अभ्यास करून घेण्यांत दोन तास घालविले होते. मग त्यांना खेळायसाठी आपल्या खोलींतून पिटाळून देऊन तिनं खोलीचं दार लावून घेतलं होतं आणि अर्धा तास झोप घ्यावी, मग दादांना पत्र लिहावं आणि त्यानंतर चहा करावा असा मनाशीं बेत करून ती अंथरुणावर पडली होती.

पडल्यापडल्या त्या दिवशीच्या वर्तमानपत्रांतरून तिनं नजर टाकली. शनिवारीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक समाप्त झाली होती; महात्मा गांधींनी अखेर दोन तास भाषण केलं होतं; व्हाइसरॉयना कॉंग्रेसचा ठराव कळवून ते पत्र पाठविणार होते आणि त्या पत्राचं समाधानकारक उत्तर आलं नाही तर, पंधरा दिवस वाट पाहून ते आपली अनत्याचारी सत्याग्रहाची चळवळ सुरू करणार होते. रविवारीं सकाळीं जवाहरलाल नेहरूंचं दादर येथे जाहीर भाषण होणार होतं.

वाचतां वाचतांच कुसुमचा डोळा लागला.

मनाशीं ठरविल्यापेक्षा ती जास्त वेळ निजली असावी आणि तिला झोपहि अगदी गाढ लागली असावी.

कारण ती जागी झाली ती दचकूनच ! प्रथम क्षणभर तिला वाटलं, की दारावर टकृटक् झाल्याचं आपण ऐकत आहोंत तें स्वप्नांतच. त्यामुळं तें ऐकूनहि ती डोळे मिटून तशीच पडून राहिली. परंतु दारावरचा तो आवाज पुन्हा दोनदा झाला. समोर टेबलावरच्या घड्याळाकडे तिनं पाहिलं तों जवळजवळ चार वाजलेले दिसतांच 'अय्या' असं स्वतःशींच म्हणून ती झटकन् उठली.

दारावर पुन्हा टिकृटिक् असा आवाज झाला. " हो हो. उघडतें." असं म्हणून तिनं दार उघडलं. अच्युत दाराशीं उभा होता !

आंत पाऊल टाकतांच त्यानं विचारलं,

" समजलं का तुला ! "

झोपल्यामुळं विस्कटलेले केस दोन्ही हातांनी मागं करीत कुसुमनं विचारलं,

" काय ? "

अच्युत म्हणाला,

" गांधींना पकडलं ! "

कुसुमनं अत्यंत आश्चर्यानं विचारलं,

" म्हणजे ? सांगतां काय ? केव्हा पकडलं ? "

"आज पहाटे पकडलं म्हणे."

कुसुमनं व त्यानं एकमेकांकडे पाहिलं अन् नंतर तीं दोघं जागच्या जागीं स्तब्ध—अगदी स्तब्ध उभीं राहिलीं.

मग अगदी हलक्या आवाजांत अच्युत म्हणाला,

"वर्किंग कमिटीच्या सगळ्या सभासदांचीहि धरपकड झाली म्हणतात."

पुन्हा तीं दोघं एक शब्दहि तोंडावाटे न काढतां उभीं राहिलीं. त्यांनी एकमेकांच्या नजरेला नजरहि दिली नाही. जणू कसल्या तरी आकस्मिक आघातानंतर त्यांना तोल सावरायचा होता !

त्या क्षणीं या दुर्दैवी देशांत किती तरी ठिकाणीं किती तरी माणसं अशींच मुकीं होऊन जागच्या जागीं उभीं राहिलीं असतील अगर बसलीं असतील !

* * *

दुसऱ्या दिवशीं कॉलेजांतलं वातावरण एकदम पार बदललेलं. अभ्यास, खेळ व करमणूक यांबद्दलच्या उत्साहाची गेल्या दोन महिन्यांत उठलेली लाट एकदम पार विरून गेली आणि तिची जागा एका निराळ्याच लाटेनं घेतली. ही नवी लाट नुसती अधिक जोराची नव्हती— तिचं स्वरूप अगदी निराळं होतं. गाढ दुःख, संताप, आवेश अशा अनेक प्रखर भावनांच्या तप्त रसाची ती लाट होती !

त्या दिवशीं कॉलेजांत अगदी संपूर्ण हरताळ पाळला गेला. मुलांमुलींचे चेहरे खिन्न तर दिसत होतेच; परंतु त्यांच्या नजरेंत कसला तरी निश्चयहि जागृत झाल्यासारखा दिसत होता !

त्या दिवशीं विद्यार्थ्यांची मोठी सभा झाली आणि नंतर रोजच सभा भरूं लागल्या त्या एकाहून एक प्रचंड अशा. अच्युतनं आपल्या भाषणांनी सारे विद्यार्थीच नव्हे तर सामान्य जनताहि चैतन्यमय करून टाकली.

जिकडे तिकडे धरपकड चालू झाली होती आणि सभाबंदीचे हुकूम निघत होते. कोल्हापूरहि फार दिवस मोकळं राहील हें शक्य नव्हतं. शनिवार ता. १५ रोजीं संध्याकाळीं सभाबंदीचं कलम कोल्हापुरांत पुकारण्यांत आलं

आणि दुसऱ्या दिवशीं कुणाकुणाची धरपकड होणार याविषयी लोक आपापसांत चर्चा करूं लागले. त्यांत अच्युतचं नांव अर्थातच होतं.

परंतु अच्युत पकडला गेला नाही. आणि तो कोल्हापुरांतहि दिसेनासा झाला. कुसुमला त्याच्याबद्दल कुणी विचारलं तर ती म्हणे, "ते कुठं आहेत तें मलासुद्धां माहीत नाही." तिच्या स्वतःवर पकडवॉरंट असल्याची बातमी मधेच कुणी तरी येऊन तिला सांगे. पण त्यावर ती हसून म्हणे,

"शीः ! मला कशाला पकडताहेत ! माझा काय संबंध आहे चळवळीशीं !"

जयवंतरावांनी तिला पत्रांत लिहिलं, की "कोल्हापुरांत फार अस्वस्थता आहे असं ऐकतों. तेव्हा तिथलं बिऱ्हाड मोडून तुम्ही सगळींच इकडे या. मुंबई सोडून गेलेलीं पुष्कळ कुटुंबं आता परत येत आहेत."

कुसुमनं उलट उत्तर लिहिलं, "इथलं बिऱ्हाड मोडून तिकडे येण्याची तुमची सूचना मला पसंत नाही. इथं बरीच अस्वस्थता आहे हें खरं; परंतु आज अस्वस्थता नाही कुठं ? सगळीकडेच आहे. तुम्ही उगीच काळजी करूं नका."

* * *

अशा प्रकारें सुमारें पंधरा दिवस गेले असतील. एके दिवशीं सातारा जिल्ह्यांतल्या एका तालुक्याच्या गावीं दंगा व गोळीबार झाल्याच्या बातम्या आल्या. वर्तमानपत्रांत आलं त्यापेक्षा किती तरी अधिक घडल्याच्या हकीगती लोकांच्या बोलण्यांत येऊं लागल्या. अच्युत गोळीबाराला बळी पडल्याची अगदी दाट वदंता पसरली.

कुसुमनं त्या वदंतेवर बिलकुल विश्वास न ठेवण्याचा निश्चय करून कांही दिवस काढले. परंतु नंतर तिचा धीर खचूं लागला. अच्युत सुखरूप असता तर कसंहि करून आपली खुशाली तिला कळावी अशी व्यवस्था त्यानं केली असती. परंतु त्याच्याकडून बोटभर चिठी अथवा निरोप कांहीच आलं नव्हतं.

कुसुमच्या दुःखाचं वर्णन करणं कसं शक्य आहे ?

अच्युतवर तिचं प्रेम जडलं तेव्हाच तिनं आपल्या मनाला बजावलं होतं, की या प्रेमांतून लौकिकार्थानं ज्याला सुख म्हणतात त्यापेक्षा दुःखच अधिक

उद्‌भवेल तें सोसण्याची तयारी मला ठेवली पाहिजे. नंतर गांधी पकडले गेले तेव्हांच तिनं ओळखलं होतं, की आता आपल्या धीराची कसोटी आहे. परंतु ती कसोटी इतक्या भयंकर स्वरूपाची असेल अशी तिला कल्पना नव्हती! त्यामुळं अच्युतच्या मृत्यूबद्दलची वदंता खरी मानण्याचा समय आलेला पाहून तिला अगदी अनावर शोक झाला.

आणि या शोकांतहि तिला एक जबाबदारी विसरतां येत नव्हती.

अच्युत ज्या दिवशीं कोल्हापुरांतून नाहीसा झाला त्या दिवशीं कुसुमचा निरोप घेण्यापूर्वीच्या एकान्तांत तो तिला म्हणाला होता,

" तुझं माझं लग्न जरी प्रत्यक्ष झालेलं नाही तरी माझ्या आईची तूं सून आहेस."

ती हसून म्हणाली होती. " हो, आहे."

" मग तूं तिला संभाळलं पाहिजेस."

" अर्थात्." असं तिनं तत्परतेनं त्या वेळीं म्हटलं होतं.

परंतु त्या क्षणीं तिला कल्पनाहि नव्हती अशा प्रकारें स्वतःचा तो उद्‌गार खरा करून दाखवण्याचा प्रसंग आता तिच्यावर आला होता!

* * *

अच्युतच्या निधनाची बातमी त्याच्या आईला सांगण्यासाठी ती साताऱ्यास गेली. त्या वृद्ध मातेचं दुःख डोळयांनी पाहायची तिनं आपल्या मनाची विलक्षण तयारी केली होती.

परंतु तिची ती सारी तयारी चुकीच्या हिशोबाची ठरली.

मागं अच्युतबरोबर ती साताऱ्यास आली होती त्या गोष्टीला अवघा एक महिनाच लोटला होता. परंतु या अल्पावधींत अच्युतची आई विलक्षण थकलेली दिसली. जुन्या पिढींतल्या बायकांची करारी वृत्ति तिच्या ठिकाणीं होती म्हणून तिनं अंथरूण धरलं नव्हतं इतकंच. कुसुम आलेली पाहतांच तिला फार आनंद झाला, अन् तिच्याजवळ आपल्या संसारांतल्या सुखदुःखाच्या आणि आपल्या दोघां मुलांच्या आठवणी काढून ती सारखी बोलत राहिली. विनायकच्या गोष्टी सांगतांना तिच्या सुरकुतलेल्या खोल डोळयांतून अश्रु वाहूं

लागत; परंतु मग ती आपण होऊनच अच्युतच्या गोष्टी सांगूं लागे व तिच्या डोळयांतल्या आसवांचं रूपांतर आनंदाश्रूंत होई. ती पुनः पुन्हा म्हणे,

" आता माझा अच्युत हाच एक माझ्या सुखाचा तंतु उतरला आहे. त्याचा संसार पाहिला की मग मी आनंदानं डोळे झाकीन. लवकरच येऊन पुन्हा भेटन असं तो म्हणाला होता. तीन वार होऊन गेले तरी कसा आला नाहीं कोण जाणे! पण त्याचीं कामं त्याला आहेत. मला तीं कळत नाहीत. पण सवड झाल्याबरोबर तो माझ्या भेटीला येईल. चुकायचा नाही..."

त्या वृद्धेचं असलं बोलणं ऐकलं की कुसुमच्या मनाची सारी तयारी पार विरघळून जात असे. अच्युतची खरी वार्ता सांगयचं बाजूलाच राहून तिनं उलट दर वेळीं तिला म्हणावं,

" येतील. सवड होतांच ते येतील. ते सध्या फार कामांत गुंतले आहेत, म्हणून मला त्यांनी निरोप सांगायसाठी पाठवलं, की मी सुखरूप आहे."

आणि अखेर कुसुम साताऱ्याहून परतली ती अच्युत सुखरूप असून लवकरच भेटायला येणार आहे, असा त्याच्या आईचा अगदी दृढ समज करून देऊनच. आपण तिच्याशीं प्रतारणा केली हेंच योग्य असं समाधान ती मानीत होती. मात्र या समाधानानं तिच्या स्वतःच्या अंतःकरणाची व्यथा थोडीच कमी होण्यासारखी होती ? अच्युत आपल्याला आता कधीहि भेटणार नाही हें मनांत आलं की तिच्या अंतःकरणाचं अगदी पाणी पाणी होई.

* * *

ती घरीं परत आली ती शरिरानं अन् त्याहीपेक्षां मनानं थकून. घर तिला अगदी भयाण वाटूं लागलं. तिची आई आणि धाकटीं भावंडं घरांत होतीं; परंतु तिच्या मनांत सारखं येत होतं, अच्युत ज्या जगांत नाही त्या जगांत आपण आता जिवंत कशासाठी राहायचं ?

रात्रीची शांत वेळ तिला अगदी असह्य वाटूं लागली. तिला झोप कशी ती लागेना किंवा ती लागावी असंहि वाटेना.

मध्यरात्रीच्या सुमारास बाहेरच्या दारावरची कडी कुणी तरी वाजविल्यासारखं तिला वाटलं. भास असेल अशा कल्पनेनं ती प्रथम उठली नाही. तिच्या मनांत आलं, आपल्याला पकडण्यासाठी तर आले नसतील ? आणि

भय वाटण्याऐवजी तिला एकदम बरं वाटलं. त्या क्षणभरांत तिच्या मनांत आलं, घरीं मोकळं राहण्यापेक्षा तुरुंगांत जाऊन पडलं तर जीवित कदाचित् अधिक सुसह्य होईल...

पुन्हां दाराची कडी वाजली आणि आतां तो आवाज नीट ऐकतांच कुसुमच्या अंगावर आश्चर्याचे अन् आनंदाचे रोमांच एकदम उभे राहिले; कारण तशा प्रकारें कडी वाजविणारी एकच व्यक्ति होती. ती झट्कन् खोली उघडून बाहेरच्या दाराकडे गेली अन् तिनं बिलकुल आवाज न करतां दार उघडलं.

होय, तोच दाराशीं उभा होता!

*　　　*　　　*

यानंतर चार दिवसांनी जयवंतराव पुन्हा कोल्हापुरास आले. अच्युतच्या निधनाची बातमी त्यांच्याहि कानांपर्यंत सागोपांगी पोंचली होती; आणि कुसुमच्या मनाला हा मोठाच धक्का बसलेला असणार अशा समजुतीनं ते मुद्दाम तिला धीर देण्याच्या हेतूनं आले होते.

कुसुम अगदी दुःखीकष्टी आणि खिन्न असेल अशी त्यांची कल्पना होती; परंतु ती त्यांना तशी दिसली नाही तेव्हा मनांतल्या मनांत तिच्या विचारी-पणाचं अन् धैर्याचं त्यांना कौतुक वाटलं. तिच्याशीं एकटीशीं बोलण्याची संधि मिळतांच ते तिला म्हणाले,

"कुसुम, तूं आपलं मन पुष्कळच आवरलेलं आहेस हें पाहून मला फार बरं वाटलं. अच्युतला अशा विचित्र तऱ्हेनं मृत्यु आल्यावरहि तूं आपल्या मनाची—"

कुसुम एकदम म्हणाली, "दादा, तुम्ही काय म्हणणार तें लक्षांत आलं माझ्या. पण माझं सांत्वन करण्यासाठी कांही बोलण्याची गरज नाही."

"म्हणजे? अच्युतला मृत्यु आला ही बातमी खोटी की काय?"

"तो मला सोडून गेलेला नाही. त्याची माझी भेट वरचेवर होते."

तिच्या त्या बोलण्यानं तिचे वडील क्षणभर गोंधळले. त्यांच्या मनांत आलं, अति प्रेमांतलं माणूस मृत्युवश झालं तरी तें आपल्याला भेटत असतं असा भ्रम करून घेऊन वागणाऱ्या माणसांच्या हकीकती त्यांनी ऐकल्या होत्या

त्यांतलीच आपल्या कुसुमची गोष्ट असावी. त्या कल्पनेनं त्यांना तिची अगदी कीव आली.

परंतु त्यांनी मान वळवून तिच्याकडे रोखून पाहिलं व तिच्या नजरेंत चमकणारा आवेश अन् समाधान त्यांना दिसलं तेव्हां तें समाधान प्रेमाचं नव्हे असं त्यांना वाटलं.

मग दुसऱ्याच क्षणीं तिच्या बोलण्यांचा जो निराळाच अर्थ होण्यासारखा होता तो त्यांच्या एकदम लक्षांत आला.

आणि तो येतांच ते दचकले!

आजच्या पिढींतल्या तरुणांच्या जीविताच्या एका निराळ्याच साहसी भागाचं अकल्पित दर्शन घडल्याप्रमाणं त्यांना वाटलं.

ते कुसुमच्या गंभीर परंतु प्रसन्न चर्येकडे पाहत राहिले. त्या चर्यैत त्यांना देशाच्या भाग्योदयाचं चिन्ह स्पष्ट दिसत होतं!

—किर्लोस्कर : दिवाळी-अंक, १९४२.

---

# नादलुब्धाच्या आठवणी ! : : ३

संगीताचा उपभोग ज्याला खरोखर घ्यायचा असेल त्या माणसानं आपला सामाजिक दर्जा विसरायलं शिकलं पाहिजे आणि लोकापवादाची अवास्तव भीति फारशी बाळगतां कामा नये. मला स्वतःला संगीताचा नाद लागल्यापासून या दोन्ही गोष्टी ओळखून त्याप्रमाणें मी वागलों आहे. तसा मी वागलों नसतों तर कदाचित् लोकांची टीका मी चुकवूं शकलों असतों, पण संगीताचा जेवढा आनंद मला मिळवितां आला तेवढा मला मिळवितां आला नसता. अर्थात् लोकांची टीका चुकविण्याचं समाधान मला फारसं महत्त्वाचं कधींच वाटलं नसल्यामुळें, माझी संगीताची गोडी पूर्ण करण्यासाठीं लोकविरुद्ध आचरण करायला मीं कधींच मागं पुढं पाहिलं नाहीं. त्यामुळेंच माझ्या सामाजिक दर्जाच्या मंडळींना सहसा दुर्लभ अशा संगीतश्रवणाच्या संधी माझ्या आयुष्यांत मला मिळाल्या, अन् त्यामुळें माझ्या जीवितांतल्या सुखदुःखाच्या एकंदर हिशोबांत सुखाच्या बाजूकडे मला मोठी भर टाकतां आली असं मला वाटतं. आजपर्यंत पुष्कळच नामांकित कलावंतांचं गायन, वादन आणि नर्तन मीं ऐकलं आणि पाहिलं आहे. संगीताच्या उपभोगाच्या

या आठवणी म्हणजे माझ्या स्मृतीच्या कपाटांतील एक मोठा आल्हादकारक ठेवा आहे. त्यांपैकीं सामान्य वाचकासहि मनोरंजक वाटतील अशा कांहीं आठवणी इथें सांगतों.

गवई म्हटला कीं मोठा आढ्यतेखोर अशी सामान्य समजूत आहे. या समजुतीचा खरेपणा माझ्याहि प्रत्ययाला थोड्या फार अंशानं आलेला आहे. परंतु मला आलेल्या कांहीं अनुभवावरून मला असं म्हणावंसं वाटतं कीं गवयाच्या अंगची जी आढ्यता म्हणून म्हणतों, ती वास्तविक आढ्यता नसून आपल्या अंगच्या विद्येची कदर करण्याची अक्कल लोकांच्या ठिकाणीं नाहीं अशा शंकेच्या पोटीं जन्मलेली एक प्रकारें योग्य अशी बेफिकीरी असते. असं मी म्हणतों याचं कारण असं, कीं गायनकलेविषयीं अमर्याद उत्सुकता आणि आवड दाखविणारा मनुष्य नामांकित गवयाला भेटला कीं त्याच्याशीं तो आढ्यतेनं सहसा वागत नाहीं. याबद्दलचं माझ्या अनुभवातलं एक उदाहरण सांगतो.

सुमारें १९१६-१७ सालीं मुंबईचे एक प्रसिद्ध कामाठी कॉन्ट्रॅक्टर माझ्या ओळखीचे झाले. ही ओळख अर्थात् गाण्यावाजवण्यावरूनच झाली. एकदां असा योग आला कीं ते व मी मिळून अलाहाबादला गेलों. ज्या माणसाला गाण्याचा नाद आहे तो कोठल्याहि शहरीं गेला कीं तिथलीं प्रेक्षणीय स्थळं एक वेळ पाहणार नाहीं, पण तिथं नांव घेण्यासारखीं गाणारीं, वाजविणारीं माणसं कोण आहेत याची माहिती मिळवील. अर्थात् मी व श्री. जिलकर यांनीं अलाहाबादला जातांनाच ठरवलं होतं कीं, तिथें पोंचल्यावर त्या वेळेस अतिशय प्रख्यात असलेली गायिका जानकीबाई हिचं गाणं ऐकायचं. हल्लींच्या पिढीला या गायिकेचं नांव कदाचित् ऐकूनहि माहीत नसेल. परंतु त्या काळांत कलकत्त्याची गोहर, आग्र्याची मलकाजान आणि अलाहाबादची जानकीबाई, हीं तीन नांवं सर्वतोमुखीं होतीं. त्यामुळें जानकीबाईचं गाणं ऐकल्याशिवाय अलाहाबादची यात्रा पुरी झाली असं मानायला आम्हीं तयार नसावं हें साहाजिक होतं. मात्र जानकीबाईचं गाणं ऐकायचं आम्हीं जरी मनाशीं ठरवलं तरी तें जुळायचं कसं हा एक मोठा प्रश्नच होता. कारण ती बाई साऱ्या हिंदुस्थानांत तिचं नांव त्या वेळीं गाजत होतं अशी. अन् आम्ही दोघं कोण, तर पुण्यामुंबईकडचे सामान्य मुशाफर. तिची नुसती

भेट घेणं म्हणजे सुद्धां वास्तविक आम्हांला मुष्किल ! बरं, कुणा मध्यस्थाला घेऊन तिच्याकडे जायचं म्हणावं तर अलाहाबादेचा एक माणूस सुद्धां आमच्या ओळखीचा नाहीं. आम्हीं धीर खचूं दिला नाहीं. आम्हीं एक बेत मनाशीं केला अन् त्याप्रमाणें खूप प्रयत्न करून आम्हीं जानकीबाईच्या मकाणाचा पत्ता लावला आणि सरळ वर गेलों. तिथें एक वयस्क बाई होत्या, त्यांनीं आम्हांला विचारलं,

"आपल्याला कोण पाहिजे ?"

आम्हीं म्हटलं, "जानकीबाई."

त्या बाई किंचित् हसल्या व म्हणाल्या. "मीच जानकीबाई."

आम्ही दोघे सहाजिकपणें किंचित् वरमलों अन् गप्प बसलों.

मग त्यांनींच विचारलं,

"आपलं काय काम आहे ?"

मीं धीर करून म्हटलं,

"आम्हांला आपलं गाणं ऐकायचं आहे. आम्ही पुण्यामुंबईकडची मंडळी आहोंत. आपल्या गाण्याचीं रेकॉर्ड्स् ऐकलीं आहेत आम्हीं. इकडे अलाहा-बादला येतांना आपल्याला एकदां प्रत्यक्ष डोळयांनीं पाहावं अन् आपलं गाणं प्रत्यक्ष ऐकावं असा हेतु आम्हीं मनाशीं धरला आहे. तो पुरा कराल तर आपली मोठी मेहेरबानी होईल. आपला आमचा पूर्वीचा परिचय नसतांना आम्हीं एकाएकीं आपल्या घरीं यावं अन् आपल्याला गायची विनंति करावी हें अतिशय चमत्कारिक वाटण्यासारखं आहे. पण तें आपण मनावर घेणार नाहीं, आणखी आपल्या गाण्यावर आम्ही अतिशय लुब्ध आहोंत हें ध्यानांत आणून आमच्या विनंतीचा विचार कराल अशी आशा आहे."

माझं हें बोलणं ऐकतांच बाई एकदम म्हणाल्या,

"समजलं, समजलं. आपण मुळींच फिकीर करूं नका. आपल्याला मी अवश्य गाणं ऐकवतें."

आणि खरोखरच त्यांनीं लगेच आपल्या साथीदारांना बोलावून घेतलं आणि आम्हांला गाणं ऐकवलं.

आतां सांगा, गवई आढ्यतेखोर असतात हा आक्षेप सर्वस्वी खरा कसा मानायचा ?

अर्थात् जानकीबाईनीं जें विलक्षण सौजन्य आम्हांला दाखवलं तें लहरी-पणाच्या सदराखालीं कांहीं लोक घालतील. पण लहरीपणा असं नांव दिल्यानं सुद्धां तो अवगुण ठरतो असं मला वाटत नाहीं. उलट तो गुणच मानला पाहिजे, असं मी म्हणेन. कारण, एक तर असा लहरीपणा गाणाराच्याच ठिकाणीं नव्हे तर सर्वच कलावंतांच्या ठिकाणीं असतो. मला असे एक प्रख्यात चित्रकार माहीत आहेत, कीं जे राजेरजवाडे अगर श्रीमंत लोक त्यांचीं चित्र पाहायला आले तर 'माझं आज डोकं दुखतंय्, उद्यां या' असा त्यांना घरांतून निरोप पाठवतात; पण उलट थोडीशी चित्रकला जाण-णारा अगर चित्रकलेच्या नादीं असणारा इसम त्यांच्याकडे गेला तर त्याला आपलीं चित्रं दाखवून चित्रकलेबद्दलचीं आपलीं मतं त्याला घटका घटका सांगत बसतात. आणि शिवाय असं कीं, गाणाऱ्या वाजवणाऱ्यांच्या ठिकाणीं हा लहरीपणा असतो म्हणून तर पैशानं असमर्थ परंतु हौसेनं समर्थ अशा आमच्यासारख्या लोकांना त्यांच्या कलेचा मनःपूत उपभोग घेतां येतो.

* * *

जानकीबाईबद्दलची जी आठवण वर सांगितली, तशीच एक रहिमतखां-बद्दलची आठवण सांगण्यासारखी आहे. १९१७ सालांतलीच आठवण आहे ती. त्या वेळीं रहिमतखांचं गाणं दुर्मिळ झालेलं होतं. त्यांचं गाणं साऱ्या जगाला ऐकविण्याची कामगिरी श्री. छत्रे यांनीं केली, हें पुष्कळांना ऐकून माहीत असेल. छत्र्यांच्या मृत्यूनंतर रहिमतखांचे दौरे बंद झाले, आणि ते कुरुंदवाड येथें जाऊन स्वस्थ बसले. त्यांचं गाणं ज्याला ऐकायचं असेल त्यानं कुरुंदवाडला गेलं पाहिजे अशी स्थिति उत्पन्न झाली. त्यांच्या ऐन जवानींत त्यांचं गाणं ज्यांनीं ऐकलं होतं त्यांच्या तोंडून रहिमतखांच्या अलौकिक गाण्याची प्रशंसा मला वारंवार ऐकायला मिळाली होती. त्यामुळें त्यांचं गाणं प्रत्यक्ष ऐकायची मला साहजिकपणेंच विलक्षण इच्छा झाली. म्हणून मी कुरुंदवाडला गेलों. मी गांवांत शिरलों त्या वेळीं सकाळचीं उन्हं नुकतींच पसरूं लागलीं होतीं. ज्यांच्या घरीं मी उतरलों त्यांनीं माझा चहा वगैरे आटोपल्यावर मला माडीलगतच्या गॅलरींत बोलावून नेलं अन् समोर बोट दाखवून म्हटलं,

"तें पाहिलंत का!"

मीं पाहिलं तों समोरच्या गटारांत एक धिप्पाड काळासावळा म्हातारा अंगावर एक चादर ओढून घेऊन बसला होता. आणि कोंवळं ऊन खात खात पांचसहा शेंबड्या पोरांशीं बैदूल खेळत होता.

मीं माझ्या मित्रांना विचारलं,

"कोण आहे हा इसम?"

त्यांनीं मला हसून उत्तर दिलं,

"ज्यांचं गाणं ऐकायसाठीं तुम्ही पुण्याहून मुद्दाम आलां आहांत ते हेच गृहस्थ."

"काय! रहिमतखां ते हेच?" असा आश्चर्याचा उद्‌गार माझ्या तोंडून निघाला.

ज्याच्या मधुर गायनावर सारी दुनिया लुब्ध होती, तो अलौकिक गवय्या कुरुंदवाडसारख्या खेडेगांवांत सकाळच्या प्रहरीं उघड्या नागड्या पोरांशीं बैदूल खेळत बसलेला दिसेल अशी माझी कल्पना नव्हती.

आणि नंतर चारच घटकांनीं मीं रहिमतखांचं गाणं ऐकायला बसलों तेव्हां त्यांचा थाट किती निराळा असलेला मला दिसला! उंची शेरवानी, सर्कसवाले छत्रे ज्या तऱ्हेची भरजरी टोपी घालत असत त्या तऱ्हेची टोपी, अशा बादशाही थाटांत ते बैठकींत प्रविष्ट झाले, आणि एकाद्या राजासारखे गादीवर येऊन बसले. मला नंतर असं कळलं कीं रहिमतखांचा हा भरजरी पोशाख अगदीं ठरलेला होता, इतका कीं 'चला खांसाहेब गायला बसायचं आहे' असं सांगण्याऐवजीं तो पोशाख त्यांना चढविला कीं त्यांना कांहींच सांगावं लागत नसे. ते आपोआपच समजत कीं आपल्याला आतां गायचं आहे!

* * *

आजची गोष्ट मला माहीत नाहीं, पण १९२४ सालीं मी मुंबईस होतों त्या वेळीं, 'शुक्रवार क्लब' या नांवाचा एक क्लब तिथं होता. त्या क्लबांत प्रत्येक शुक्रवारीं गाण्यावाजवण्याची जंगी मैफल झडत असे. दर वर्षी रंगपंचमीच्या दिवशीं तर संगीताचा उरुसच होत असे म्हणाना! त्या दिवशीं केवळ मुंबई-तलेच नव्हे, तर दूरदूरच्या बाहेरगांवचे मुद्धां गाणारे वाजविणारे, नायकिणी नर्तिका, तिथें जमत असत. अर्थात् गाणं वाजवणं ऐकायची तहान मनसोक्त

भागवून घेण्यासारखं तें स्थळ अन् तो प्रसंग असे. ज्याला तहान भागवून घ्यावयाची आहे त्यानं पुरी केली पाहिजे अशी एकच अट असे ती ही कीं, मी डॉक्टर, मी वकील, मी प्रोफेसर, मी या अशिक्षित आणि अप्रतिष्ठित लोकांत कसा मिसळूं असल्या कल्पना त्यानं पार टाकून दिल्या पाहिजेत. मी स्वतः या शुक्रवार क्लबांत वारंवार जात असे, आणि तिथला रंगपंचमीचा जलसा तर कधींच चुकवीत नसे. एका रंगपंचमीच्या प्रसंगीं जो एक विनोदी प्रसंग घडला तो सांगण्यासारखा आहे.

त्या दिवशीं नेहमींप्रमाणें कार्यक्रमाला प्रारंभ झाला. गाण्यांतल्या शिरस्त्या-प्रमाणें प्रथम एक दोन स्थानिक गायकांचीं गाणीं झालीं, आणि नंतर बाहेर-गांवांहून आलेल्या पाहुण्या गवयांचीं गाणीं पाळीपाळीनं सुरू झालीं. जलशा-ची एकंदर व्यवस्था ज्यांच्याकडे होती त्यांच्या शेजारींच मी बसलों होतों. त्यामुळें मला असं दिसून आलं कीं, त्यांना कुणी तरी सारखं डिवचीत आहे, आणि त्यांना चैन पडूं देत नाहीं, आणखी ते हलक्या आवाजांत त्याची समजूत घालायचा प्रयत्न करताहेत. मीं त्यांना त्याबद्दल हलकेंच विचारलं, तेव्हां मला कळलं कीं त्यांना डिवचणारा इसम मुंबईतला एक पखवाजी होता. त्यानं वाटतं आपल्या आठ दहा वर्षांच्या मुलाला पखवाज शिकवला होता; अन् त्याची बिचाऱ्याची अशी समजूत होती कीं, आपल्या मुलासारखा पखवाज वाजविणारा साऱ्या हिंदुस्थानांत सापडावयाचा नाहीं. त्याची ती समजूत प्रामाणिक खरी पण चुकीची होती, येवढाच काय तो त्याच्यांत आणि माझ्या मित्रांच्यांत मतभेद होता. त्यामुळें माझे मित्र त्याचं म्हणणं ऐकायला तयार नव्हते आणि त्याचा तर त्यांना सारखा आग्रह चालला होता कीं, माझ्या मुलाला बसवा. एखाद्याचा मुजरा पुरा झाला कीं तो माझ्या मित्रांना म्हणे, 'आतां माझ्या मुलाचं होऊन जाऊं द्या.' अशुभस्य कालहरणम् या न्यायानं माझे मित्र त्याला दर वेळीं म्हणत, 'जरा थांबा, एवढं झालं कीं तुमचा मुलगाच.' त्या गृहस्थाला माझ्या मित्रांचं हें आश्वासन कांहीं वेळ खरं वाटलं, पण मैफल सुरू होऊन चार तास झाले तरी जेव्हां त्याच्या मुलाचा नंबर लागेना तेव्हां त्यांच्या आश्वासनाची त्याला शंका यायला लागली. त्याच्या बोलण्याचा स्वर अधिकाअधिक उंच होऊं लागला अन् तें प्रकरण अक्षरशः हातघाईवर येणार असा मला रंग दिसूं लागला. त्या

म्हाताऱ्या पखवाजीचे भांगेनं तारवटलेले डोळे पाहून मला माझ्या मित्रांच्या शरीरस्वास्थ्याची जरा काळजीच वाटायला लागली.

मीं त्यांना हलकेंच म्हटलं,

"उगीच कशाला विकोपाला नेतां गोष्टी ? बसवा त्याच्या मुलाला पांच दहा मिनिटं."

यावर माझे मित्र मला हसून म्हणाले,

"अहो, पांच दहा मिनिटांत सुटका होण्यासारखी असती तर मीं केव्हांच बसवलं नसतं का त्याला ? पण त्या कार्ट्यांला वाजवतां तर येत नाहींच कांहीं, पण एकदां तो गादीला चिकटला कीं चार घटकांची निचिंती आहे. हें पात्र आमच्या चांगलं ओळखीचं आहे."

याचा परिणाम असा झाला कीं अखेर त्या पखवाजीनं आमच्या मित्रांना मोठ्यानं विचारलं,

"काय, माझ्या मुलाला बसवायचं आहे कीं नाहीं तुम्हांला ?"

आणि माझ्या मित्रांनींहि तितक्याच उंच आवाजांत सांगितलं,

"नाहीं."

मग मला थांबा थांबा कशाला म्हणतां ?"

"इतका वेळ म्हटलं, आतां नाहीं म्हणत."

"मग जाऊं मी माझ्या मुलाला घेऊन ?"

"कांहीं हरकत नाहीं. नमस्कार !"

तें ऐकतांच सारे लोक खो खो हसूं लागले.

त्याबरोबर तो पखवाजी विलक्षण क्रुद्ध झाला आणि ओरडला,

"ठीक आहे जातों. पण तुमच्या या मैफलीला शाप दिल्यावांचून जाणार नाहीं."

ते त्याचे क्रोधाचे शब्द ऐकून आम्हां सर्वांना हसूं तर आलंच, पण हा आधुनिक विश्वामित्र आतां कोणता शाप उच्चारणार त्याची कल्पना करतां न आल्यानं आम्ही सर्वजण उत्सुकतेनं त्याच्याकडे पाहत राहिलों.

त्यानं आपल्या मुलाला खसदिशीं ओढून बैठकीच्या मधोमध जाणून उभं केलं, पखवाज स्वतःच्या गळ्यांत अडकवला, सुमारें एक मिनिटभर तो दोन्ही हातांनीं बडवला, आणि नंतर सगळ्या सभेला उद्देशून स्वारी रागारागानं

कायसं बोलली आणि मग दोन्ही हातांनीं मनसोक्त शंखध्वनि करून मुलाला खसृदिशीं ओढून सभेतून निघून गेली !

या संगीतांतल्या विश्वामित्राला नांवं ठेवायची इच्छा मात्र मला होत नाहीं. कारण त्याला बिचाऱ्याला अडाणी ठरवून नांवं कशाला ठेवायचीं ? साहित्य-संमेलनाच्या व्यासपीठावरून गुळाला चिकटलेले मुंगळे ओरबाडून काढावेत त्याप्रमाणें, अमक्या अमक्या कवींना ओढून काढल्याचीं रसभरीत वर्णनं आपण वाचतोंच कीं नाहीं ?

ही आठवण सांगण्यांत चार गाणारे वाजवणारे एकत्र आले कीं भांडण आणि मारामारी ठरलेली, अशी जी सामान्य समजूत आहे तिला पुष्टी देण्याचा माझा हेतु आहे, असं मात्र नाहीं. त्या समजुतीचा खरेपणा जरी मला अनेक वेळां पटला आहे, तरी त्याची वाच्यता करण्यात काय अर्थ आहे ? मात्र, तो विषय सोडला तरी गाणं आणि अव्यवस्थितपणा—विशेषतः ऐन मुसलमानी थाटाची मैफल आणि अव्यवस्थितपणा यांचा समन्वय आहे कीं काय अशी शंका येण्यासारखे मला जे अनेक अनुभव आले त्यांतला एक सांगतों.

* * *

सुमारें सात वर्षांपूर्वी मी एकदां कांहीं कामासाठीं बडोद्यास गेलों. ज्यांच्या घरीं उतरलों त्यांना मीं विचारलं,

" आज रात्रीं आम्हांला कांहीं गाणं वाजवणं ऐकवतां का ? "

ते म्हणाले, " तुमचं हें आदरातिथ्य आमच्या हातून व्हायचं नाहीं बुवा ! "

त्या गृहस्थांचा सोवळेपणा मला माहीत होता म्हणून मीं त्यांना अधिक आग्रह केला नाहीं, आणि एकटाच घराच्या बाहेर पडलों. मांडवीच्या हमरस्त्यावर गेलों तों अचानकपणें जुन्या ओळखीचा एक सारंगीवाला भेटला. त्याच्याशीं हवापाण्याच्या आणि प्रकृतीच्या मामुली गोष्टी झाल्यावर मीं त्याला म्हटलं,

" या वायफळ गोष्टी राहूं देत. कांहीं गाणं वाजवणं ऐकवतोस का बोल. कुणी आहे का नवं माणूस बडोद्यांत ? "

तो म्हणाला, " तुमच्या सुदैवानं आहे. "

" खरं ? कोण रे ? "

" लखनौची असगरी नांवाची एक नाचणारी मुलगी आहे. नुकतीच इथं आली आहे. फार तयार नाचते ! येतां ? "

मीं म्हटलं, " चला."

मग आम्ही गेलों आणि लखनौच्या त्या मुलीचा नाच पाहिला.

कित्येक दिवसांत मीं इतका चांगला नाच पाहिला नव्हता.

नाच आटोपल्यावर मी जेव्हां रजा घेऊं लागलों तेव्हा माझ्या ओळखीचा तो सारंगीवाला मला म्हणाला,

" साहेब, आपल्याला लवकर परत गेलंच पाहिजे का ? "

" कां ? "

" नाहीं, आपल्याला वेळ असेल तर आपण जाऊं या."

" कुठें ? "

" इथें छावणीमधें आज रात्रीं गाण्याबजावण्याचा मोटा उरुस आहे. त्या ठिकाणीं शहरांतल्या सगळ्या गाणारणी आणि नाचणारणी येऊन मुजरा करणार आहेत. आलांत तर अगदीं पोटभर गाणं वाजवणं आणखी नाच ऐकायला अन् पाहायला मिळेल. या असगरीचाहि नाच तिथं व्हायचा आहे. येत असाल तर पहा. सगळे मिळूनच जाऊं."

" पण तो जलसा सुरू केव्हां व्हायचाय ? "

" आतां अकरा वाजले आहेत ना ? आपण पोंचूं तों जलसा सुरू व्हायची वेळ झालीच असेल."

मीं मनाशीं म्हटलं, पोटभर गाणं वाजवणं ऐकण्याचा आज मोटा योग दिसतोय. आणखी त्या मंडळींच्या बरोबर गेलों.

छावणीचं ठिकाण शहरापासून पुष्कळच लांब आहे. तिकडे आम्ही गाडींतून गेलों. तिथें खूप मोठा विस्तीर्ण मंडप घातलेला होता अन् रोषणाई केलेली होती. मंडपाच्या बाहेर चहा, कॉफी आणि पक्की रसोई मोठ्यामोठ्या चुल्यांवर तयार होत होती आणि येणारे जाणारे लोक त्यांचा समाचार घेत होते. मला उपास आहे अशा सबबीवर मीं त्या आदरातिथ्यांतून स्वतःला बचावलं. जिकडे तिकडे लष्करी थाटाचे धिप्पाड तुमानवाले लोक दिसत होते. आंत जाऊन मी बैठकीवर बसलों तों मला दिसून आलं कीं, धोतर नेसलेला दक्षिणी मनुष्य मीच काय तो एकटा तिथें होतों. मुख्य बैठकीच्या

दुतर्फा पन्नास साठ नायकिणी आपआपल्या परी नटून थटून बसल्या होत्या, आणि त्या सगळयाजणी विडे तयार करण्यांत गुंतल्या होत्या. एखाद्या चुकलेल्या वाटसराप्रमाणें कांहींशा बावरलेल्या नजरेनं मी त्या विचित्र देखाव्याकडे पाहत बसलों.

सुमारें अर्धा तास गेला तरी गाणं वाजवणं सुरू होण्याची कांहींच हालचाल दिसेना. बैठकीवर माझ्या शेजारीं कुणी बसलं नव्हतं. माझ्या ओळखीचा तो सारंगीवाला आणि ती असगरी नांवाची मुलगी दूर कलावंतांच्या घोळक्यांत बसलेली होती, त्या दोघांना मी पुनः पुन्हा खूण करून विचारूं लागलों, जलसा केव्हां सुरू होणार? तीं दोघें मला उलट खुणेनं सांगूं लागलीं, आत्तां पांच मिनिटांत सुरू होईल. बसा.

खिशांतल्या सिगरेट्सची संख्या कमी करीत मी बसलों.

पुन्हा अर्धा तास गेला आणि जवळ जवळ एक वाजला तरी जलसा सुरू होण्याचं चिन्ह दिसेना!

मीं त्या सारंगीवाल्याला जवळ बोलावलं, आणि म्हटलं, "अरे बाबा, मी जातों. मला एक टांगा तरी करून दे."

तो म्हणाला, "छे छे साहेब! बसा बसा. अशी संधि पुन्हा येणार नाहीं. आत्तां सुरू होईल—"

अरे पण या बायका तर सगळ्या इथं हजर दिसताहेत, मग जलसा सुरू व्हायला खोटी काय म्हणून?"

त्याचं असं आहे साहेब, छावणींतल्या एका मोठ्या मुसलमान अंमलदाराच्या मुलाच्या लग्नानिमित्त हा जलसा आहे."

"मग?"

"तो नवरा मुलगा आतां वाजतगाजत इथं येईल. मग काजी येऊन नवऱ्या मुलाला आशीर्वाद देईल, अन् येवढं झालं कीं जलसा सुरूच कीं! जाऊं नका साहेब. आपण थांबाच."

मी पुनः थांबलों आणि धूम्रपान करीत वेळ काढूं लागलों.

कांहीं वेळानं नवरा मुलगा वाजत गाजत आला अन् बैठकीवर येऊन बसला. माझ्या जीवांत जीव आला. मीं मनाशीं म्हटलं, आतां लवकरच गाणं वाजवणं सुरू होईल.

पण पुन्हा अर्धा पाऊण तास गेला तरी गाण्या वाजवण्याला पत्ता नाहीं!
मीं त्या सारंगीवाल्याला पुन्हा जवळ बोलावलं अन् विचारलं,
" अरे बाबा आतां कां अडलंय् ?"
तो म्हणाला, " काजीसाहेब आले पाहिजेत ना ?"
" ते कां येत नाहींत ?"
" कां कसलं ? कुठल्या नायकिणीच्या घरीं ते पडले असतील तें सांगतां येत नाहीं. त्यांना शोधावयासाठीं चार सहा मोटारी पाठवल्या आहेत त्याला दोन तास होऊन गेले."
आपल्या या उत्तरांत कांहीं विनोद आहे, अशी त्या बिचाऱ्याला शंकासुद्धां नव्हती म्हणून मी मनाशींच हसलों आणखी एखाद्या अवघड प्रश्नाचं उत्तर कळल्यासारखी गंभीर चर्या करून त्याला म्हटलं,
" असं असं !"
" समजलांत साहेब ! पण आतां आपल्याला फार वेळ थांबावं लागणार नाहीं, शोधायला गेलेलीं माणसं आत्तां घेऊन येतील काजीसाहेबांना."
मी पुन्हा थांबलों. पण पुन्हा अर्धा तास गेला तरी गाण्याबजावण्याच्या नांवानं सामसूमच !—जिकडे तिकडे लोक खात होते, धूम्रपान करीत होते, पानपट्ट्या चघळीत होते. जलशाला म्हणजे उशीर होतो आहे याची जशी कांहीं कुणाला दादच नव्हती !
मी शेवटीं चिडलों अन् उठून घरीं निघून आलों.
दुसऱ्या दिवशीं सकाळीं नऊ वाजायच्या सुमारास मला एका स्नेह्यांच्याकडे चहाला जायचं होतं म्हणून बाहेर पडलों. रस्त्यानं थोडा गेलों तोंच तो सारंगीवाला भेटला.
मीं त्याला म्हटलं,
" खूप पाहिला बाबा तुम्हां लोकांचा जलसा !"
" हें काय साहेब ! आपण निघून कां आलांत ?",
"अरे निघून येऊं नाहीं तर काय करूं ? तुमचा तो जलसा अकरा वाजतां सुरू व्हायचा होता, अन् पहाटे अडीच वाजले तरी सुरवातीला पत्ता नाहीं!"
" साहेब, तेंच सांगायला आलों ना मी तुम्हांला ? आत्तांच सुरू झालाय जलसा. येत असलां तर चला."

—प्रतिमा : फेब्रुवारी, १९३७

## मराठी अंगवस्त्रांचें शुद्धीकरण : : ४

कां नको ? सगळ्या बाबतींत शुद्धीकरण चाललें असतांना अंगवस्त्रांच्या बाबतींतच तेवढें तें कां नको ? धर्म, नीति, भाषा यांपैकीं प्रत्येक गोष्टींत शुद्धीकरणाचा अट्टाहास चालला आहे; आणि अंगवस्त्रांकडेच तेवढें कसें कुणाचें लक्ष जात नाहीं ! तसें म्हटलें तर भाषा कांहीं आपल्या अंगाला चिकटत नाहीं; पण अंगवस्त्रें चांगलींच चिकटतात. निदान तीं अंगाला चिकटून ठाकठीक बसावींत या उद्देशानें आपण शिंप्याला पैसे देतों. ( बरेच तगादे लागल्यावर ! ) आपला हा प्रशंसनीय उद्देश शिंप्याच्या मनाला कधींच शिवत नाहीं म्हणा ! ( त्याचा शिवायचा धंदा असून ! ) तें कांहीं असलें तरी, आपल्या अंगवस्त्राची भ्रष्टता भलतीकडे वाढत चालली आहे हें लक्षांत घेऊन हिंदु पुढाऱ्यांनीं त्याच्या शुद्धीकरणाची चळवळ जोरानें हातीं घेतली पाहिजे हें त्रिवार ( अर्थात् कापड मोजण्याचाच वार या ठिकाणीं अभिप्रेत आहे हें उघड आहे ! ) सत्य होय !

आपण हिंदु लोक— महाराष्ट्रांतील हिंदु लोक— काय नमुन्याचा पेहराव करतों याचा कोणी कधीं विचार केला आहे काय ? मुंबईच्या गिरगांवच्या

नाक्यावर सकाळीं साडेनऊ वाजतां उभें राहिलें व टमरेलीच्या टमरेली भरून कचेऱ्यांकडे धाव घेणाऱ्या हिंदूंकडे पाहिलें तर काय दिसेल ?

ते पहा आमचे शंकरराव पुरोहित ! त्यांचें नांव पाहावें तों त्यांत आदि हिंदु दैवतांपैकीं एक दैवत आणि अस्सल वेदकालच्या यज्ञयागांतील एक प्रमुख अधिकारी यांचें केवढें उदात्त मिश्रण झालेलें आहे. पण त्यांच्या पोशाखाकडे पाहतांच प्रत्यक्ष शंभुदेवास भांगेची निशा उतरण्याइतकें आश्चर्य वाटायला हरकत नाहीं. त्यांची ती ऐन टफेटा रेशमाची घडीदार विजार, ट्रॅमच्या कंडक्टरचें प्रतिबिंबहि वाटल्यास ज्यांत खुशाल पाहून घ्यावें असे पॉलिशबाज बूट आणि फुलपांखराच्या पंखांचा भास उत्पन्न करणारा कंठभूषण बो, या जाम्यानिम्यांत शंकराचा व पुरोहिताचा मागमूस कोठें लागण्यासारखा आहे, हरि जाणे !

नाहीं म्हणायला त्यांच्या डोक्यावरच्या केशभारांत शंकराच्या जटेशीं अत्यल्प प्रमाणांत का होईना सादृश्य सापडण्यासारखें होतें. आणि शंकराच्या डोक्यावर उतरलेल्या गंगेप्रमाणें त्यांची घरची लग्नाची गंगा त्यांच्या डोक्या-वर बसणारीच बहुतेक असेल ! तसेंच शंकररावांच्या तोंडांत अहोरात्र जळत्या राहणाऱ्या चिरुटाच्या तोंडाशीं पुनः पुन्हा साचणारी राख शंकराच्या धुमीं-तल्या राखेचीच जातकुळी सांगत असल्यास तें कबूल करावें लागण्यासारखें आहे. आणि शंकररावांनीं आपल्या मिशांवर केलेला संस्कार त्यांच्या पूर्वज पुरोहितांपासून संस्कारशास्त्रानुसारच त्यांच्या स्वभावांत उतरला आहे असें कोणी म्हटलें तर तेंहि खपेल. पण एवढ्या गोष्टी सोडल्या तर शंकररावांना त्यांच्या पोशाखावरून शंकरराव पुरोहित या नांवापेक्षां फ्रान्सिस ब्रॅगेंझा किंवा आलबर्ट डिसोझा असलेंच एखादें नांव देणें अधिक उचित ठरेल !

तसेंच शंकररावांच्या मागच्या बाकावर बसलेली गणपतराव जोशांची स्वारी पहा. त्यांच्या नांवाचा व उपनांवाचा विचार करतां, त्यांनीं पीतांबर नेसायला पाहिजे आणि डोक्यावर भलें मोठें चक्री पागोटें ठेवून हातांत पंचांग धरलें पाहिजे. पण हाय दैवा ! त्यांच्याहि कमरेला साहेबी तुमानच आहे, आणि त्यांच्या डोक्यावर पागोट्याऐवजीं साहेबी शिरस्त्र असून, हातांत धडधडीत अविंध भाषेंतला टाइम्स आहे ! अरेरे ! आणि तोंडांत मोदका-सारखा अस्सल आर्य संस्कृतीच्या खोबऱ्याचा नैवेद्य असण्याऐवजीं, कोपऱ्या-

वरच्या अखंड पारोशा मुसलमानाच्या हातची "पेशल गिला कात" पट्टी ते चघळीत आहेत! त्यांच्या तोंडांतून उत्सर्ग पावणारे ते लाल ओघळ म्हणजे हिंदु संस्कृतीच्या छिन्न देहांतून उसळलेल्या रक्तधाराच म्हणायच्या!

ब्राह्मणांनींच हिंदु अंगवस्त्राचा अभिमान सोडला आहे असें नाहीं. त्या शेवटच्या बाकावर बसलेले ते श्रीपतराव भोसले बघा! ज्यांनीं हिंदु धर्मासाठीं आत्मदान केलें, त्या शिवाजी राजांचा वंश ते सांगतात. पण त्यांच्या पोशाखांत अस्सल भोसलेशाहीचा रेसभर तरी पुरावा आहे का? त्यांच्या पायांतल्या इस्त्रीबाज तुमानीवरून ते साहेब आहेतसें वाटलें असतें. पण त्यांनीं पावलांवर मोजे चढविले नव्हते व तशा उघड्या पायांत मद्राशी चप्पल चढविली होती. अंगांतल्या कॉलरबाज गरम कोटावरून आंतसाहेबी थाटाचा शर्ट असेलसा अजमास केला असता तर तलम मलमलीच्या मुंडेछाट सदऱ्यानें त्यांची मुंडी छाटली असती. आणि श्रीपतरावांच्या डोक्यावर शिरोभूषण कसलें होतें! –तोबा! अस्सल इस्तम्बुली काळ्या झुपक्याची लाल महंमदी उंचट टोपी!

हिंदु अंगवस्त्रांचा हा वाढता भ्रष्टाकार माझ्या व माझे मित्र विठूअण्णा यांच्या हृदयांत कित्येक दिवस शल्यवत् सलत होता. हिंदु महासभा या प्रश्नाकडे लक्ष वळवील अशी आशा करीत आम्हीं पुष्कळ धीर धरला होता. पण दिवसांमागून दिवस जाऊं लागले व एकाहि पुढाऱ्याच्या भाषणांत या प्रश्नाचा पुसटसुद्धां उल्लेख आढळेना. कोंबड्याबकऱ्यांच्या जिवावर उठलेले पुढारीहि कांहीं बोलेनात व मराठी भाषेला सोवळी करण्यासाठीं उतावीळ झालेल्या दंतवैद्यांचीहि या बाबतींत दातखीळ उघडेना. शेवटीं मी संतापलों व एके दिवशीं विठूअण्णाला मीं म्हटलें,

"अण्णा, आतां या पुढाऱ्यांसाठीं खोळंबण्यांत अर्थ नाहीं. हें सत्कार्य आपणच आपल्या मनाप्रमाणें सुरू करूं. कबूल आहे तुला?"

विठूअण्णा माझ्याच विचाराचा असल्यामुळें त्याला माझी सूचना पटायला वेळ लागला नाहीं. शुद्ध अंगवस्त्रें वापरण्याची चळवळ प्रसृत करण्याचें आम्हीं ताबडतोब ठरविलें व चळवळीला आवश्यक कोणकोणत्या गोष्टी आहेत, त्याचा विचार सुरू केला. "हिंदु अंगवस्त्राभिमानी शुद्धीकरण अखिल भारतीय मंडळ" हें यथास्थित नांव सुचायला आम्हांला वेळ लागला नाहीं व अध्यक्षो-

पाध्यक्षादि कार्यकारी मंडळ बनविणें तर उपाहारासकट एक सभा बोलावितांच होऊन गेलें. आमचा विठूअण्णा स्वभावानें अगदीं आळशी व चेहऱ्यानें गबाळया असल्यामुळें, त्यालाच कार्यकारी चिटणीस करावें, असा असल्या संस्थांचा अनुभव असलेल्या लोकांनीं सल्ला दिला व मी तीन वर्षांपूर्वी एक महिन्याच्या उमेदवारीनंतर एका बँकेंतून ( ही पुढें बुडाली ! ) बडतर्फ झालों होतों त्यामुळें, संस्थेचा खजिनदार व्हावयास माझ्याइतका लायक इसम कोणीच नाहीं असें सर्वानुमतें ठरलें.

या गोष्टी चटाचट झाल्या; पण चळवळीच्या सोईसाठीं अस्सल हिंदु अंगवस्त्रें कोणतीं हें संस्थेनें एकदां कायम ठरवावें असा जेव्हां कार्यकारी मंडळाच्या सभेंत एकानें प्रश्न काढला, तेव्हां नाना तऱ्हेच्या अडचणी उपस्थित झाल्या. कारण या अनेक शतकांच्या इतिहासांत पाहिलें तर खास हिंदूंचा अमुक एक पोशाख असें सांगतां येणें फार कठीण वाटूं लागलें. शिवाजी महाराज एवढे हिंदुपदपादशाहीचे संस्थापक, पण त्यांनीं अविंधांची सुरवारच काय पण दाढीसुद्धां घेतली होती. तेव्हां त्यांचा पोशाख म्हणजे हिंदु पोशाखाचा नमुना असें म्हणतां येईना.

यावर सभेंत एकानें सुचविलें कीं, शिवाजीमहाराजांचा पोशाख शुद्ध नव्हता हें तर झालेंच, पण ज्याच्यावरचीं अक्षरें मुळींच दिसेनाशीं झालीं आहेत असा एक कागद एका जन्मांध इतिहाससंशोधकास सापडला असून, त्यावरून तो असें सिद्ध करूं पाहत आहे कीं, “ शिवाजी मुळीं १८२७ सालीं जन्मला व सत्तावन सालच्या बंडांत त्यानें टोपीवाल्यास फार मदत केली.” हें ऐकतांच आमच्या सर्वांच्या मनांतून शिवाजीचा पोशाख अर्थातच खाडकन् उतरला व नाना फडणविसांचें पागोटें, अंगरखा, कानकुंडलें वगैरे एकानें सुचविलीं. हीं अंगवस्त्रें दिसायला कशीं काय दिसतील अशी कोणीशी शंका काढतांच, सूचना मांडणाऱ्यानें तोंपर्यंत खाकेंत ठेवलेलें बासन त्वेषानें उघडलें व हुबेहूब नाना फडणविसांचें सोंग काढून सभेला रोखठोक प्रश्न टाकला कीं,

“ ज्या नानानं टोपीवाल्याला सहज लीलेनं खेळवून पुण्याचं राजकारण साफ राखलं, त्याचीं हीं अंगवस्त्रं सभेला मान्य होत नसलीं तर सभा जगली काय किंवा मेली काय सारखंच नाहीं का ? ”

त्याच्या त्या सोनापुरी धमकावणीमुळें आम्ही सारेच सभासद थंड पडलों. माझ्या मनांत रामदासांची लंगोटी सुचवावयाची होती; चोखामेळ्याचें मुंडासें पुढें मांडण्याचा एका कट्टर ब्राह्मणेतर सभासदाचा बेत असल्याचें मीं सभा सुरू होण्यापूर्वी ऐकलें होतें; व हिंदु स्त्रियांनीं आपल्या पोषाखांतून चोळी पार काढून टाकावी अशीहि सूचना एका विदुषी स्त्रीसभासदाकडून याव-याची होती. त्या विदुषीनें चिंतामणराव वैद्यांचा 'उपसंहार' व बालगंधर्वाचें नाट्यसंमेलनांतील 'भाषण' जुन्या चोळयांत बांधून आणून जवळ ठेवलेंसुद्धां होतें. पण आम्ही सर्व नाना फडणीसवाल्या सभासदाच्या भाषणानें हतबल झालों; व त्यांचा ठराव अखेर पास झाला.

या ठरावानें आमचा विठूअण्णा फारच घाबरून गेला. त्याला विडीचें व्यसन फार होतें; व अंगरखा घालायचा म्हटलें तर, 'विड्या ठेवायच्या कुठं' अशी चिंता त्याला पडली. यावर वरून अंगरखा असला म्हणजे आंत अस्सल विलायती जाकीट असलें तरी चालतें, ही युक्ति मीं त्याला दाखल्या-सकट सांगितली तेव्हां त्याचें अंमळ सांत्वन झालें; पण लगेच रडवा चेहरा करून तो म्हणाला,

"तें झालं; पण गजूभाऊ माझ्या कानांचं कसं होईल रे!"

त्याचा रडवा स्वर ऐकून मला दया आली. पण तो काय म्हणत होता तें मला नीट कळलें नाहीं म्हणून मीं विचारलें,

"कानांचं कसं होईल म्हणजे? अण्णा, तूं काय म्हणतोस?"

"अरे, सभेनं पास केलेल्या पोशाखांत नानांचीं कुंडलं आहेत ना? अन् माझ्या आईनं तर माझीं कानपाळं कधींच टोंचलीं नाहींत! आतां माझे जून कान टोचतांना मला केवढ्या वेदना सहन कराव्या लागतील या कल्पनेनंच माझा जीव घाबरा होत आहे. स्त्रियांना इतिहास न शिकविण्याचे दुष्परिणाम मला भोगावे लागणार आहेत!"

पण या सर्व लहान मोठ्या संकटांना मीं व विठूअण्णानें धैर्यानें तोंड दिलें व आमचे पोशाख पुरे होतांच दुसरे दिवशीं त्या पोशाखांतच आपापल्या ऑफिसांत जावयाचा आम्हीं बेत केला. विठूअण्णा कस्टम खात्यांत होता व मी म्युनिसिपालिटीच्या एका शाळेंत कारकून होतों. त्या दिवशीं आम्हीं आपलीं जेवणें आठालाच उरकलीं. कारण नाना फडणिसांच्या अंगवस्त्रांशीं

प्रसंग होता व त्यांत दोन घंटे सहज जाणार हें उघड होतें. नानासारखें गंध रेखण्यांतच अर्धी घटका गेली. पागोट्याचें केळें कपाळावर बसवायचें कांहीं केल्या साधेना. आणि अंगरख्याच्या बाह्यांच्या चुण्या वर करतां करतां तर जीव थकला. भाऊंच्या समशेरीला गनीम भ्यायले नसतील, इतके लोक नानाच्या अंगरख्याच्या या चुण्यांना भितील व त्यामुळें शुद्ध हिन्दी अंगवस्त्रांचा प्रसार बंद पडेल, अशीहि भीति त्या वेळीं विठूअण्णानें बोलून दाखविली. त्यावर मीं म्हटलें,

"अरे, या भीतीचं कारण नाहीं. रुमाल बांधतां न येणाऱ्यांच्या सोईसाठीं आयते बांधलेले मद्रासी रुमाल नाहींत का मिळत? तसे खऱ्या चुण्यांऐवजीं बाह्यांवर चुण्यांसारखें शेडिंग केलेले अंगरखे आपण महिंद्रकर ब्रदर्सना तयार करायला सांगूं म्हणजे झालं."

असो. पोशाख करून झाल्यावर आम्ही दोघे बाहेर पडलों; व कोपऱ्यावर जाऊन ट्रॅमची वाट पाहत उभे राहिलों. त्या वेळीं ट्रॅम कोठली लवकर मिळायला? जी येई तिचा कंडक्टर 'जगा नही!' ओरडत होता. कोपऱ्यावर उभें राहायची तर हळूहळू सोय उरली नाहीं. कारण आमचे शुद्ध पोशाख शीघ्र गतीनें लोकप्रिय झालेले दिसले. पांचदहा मिनिटांत आमच्या भोंवतीं लहान पोरांचा चांगलाच घोळका जमला होता. देशाच्या या भावी आधारस्तंभांचें लक्ष इतक्या अल्पावधींत खेचून घेतल्याबद्दल आम्हां दोघांना अर्थातच अभिमान वाटला; पण या भावी आधारस्तंभांत इतर जनतेचीहि भर झपाट्यानें पडूं लागली. जो तो आमच्याकडे पाहून थबके व हसे. एकानें मला विचारलें,

"काय हो, तुमची अन् तुमच्या कॅमेरामनची चुकामूक झाली कीं काय?"

दुसऱ्यानें असेंच विचारिलें,

"काय हो, ऐतिहासिक फिल्म आहे वाटतं?"

मला व विठूअण्णाला या प्रश्नांचा कांहींच उलगडा होईना; पण थोड्याच वेळानें जेव्हां आमच्या परिचयाचे कुशाभाऊ वाटेनें जात होते ते थांबले व मला विचारूं लागले, "काय गजूभाऊ, शाळा सोडून सिनेमांत शिरलास कीं काय आतां?" तेव्हां आमच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला.

आतां कोपऱ्यावर तिष्ठत उभें राहण्याची सोय नाहीं, ट्रॅममध्यें घुसलेंच पाहिजे, असें आम्हीं ठरविलें. पुढची ट्रॅम आली तिच्याहि दाराला आडव्या पट्टया होत्या; पण मी व विठूअण्णा पायरीवर चढलों व कंडक्टरला न जुमानतां शिरूं लागलों. कंडक्टर ओरडला, "ए, चढो मत! उतर जाव!"

विठूअण्णानें आवेशानें हिंदुस्थानींत उत्तर द्यावयाचा प्रयत्न केला; पण शेवटीं मायभाषेची कास व ट्रॅमचा कठडा धरीत तो म्हणाला,

"अरे, किती वाट पाह्यची जागेसाठीं! जाणार आम्ही!"

"जायेगा? कैसा जायेगा?" रागानें गळ्यांतल्या जस्ती पेटीवर तिकिट कातरायची कात्री मारीत कंडक्टर ओरडला, "कंपनी का कायदा नही मानते? बस्स, उतर जाव!"

विठूअण्णाच्या अंगांत जणूं पहिला पेशवा शिरला होता. जवळ आलेल्या कंडक्टरला तो म्हणाला,

"बोंबल खुशाल! उतरत नाहीं!"

ट्रॅम हालूं लागली होती; पण कंडक्टरनें संतापून दोरी ओढून घंटा वाजवितांच ती थांबली. कंडक्टर ओरडला,

"तुम तमाशेवाले नही सुनेंगे?"

त्याच्या त्या शब्दानें आमचें दोघांचेंहि चित्त भडकलें; व "कोणाला म्हणतोस तमाशेवाले?" असें ओरडून आम्ही त्या कंडक्टरवर चाल करून गेलों.

नमूद करावयास अत्यंत खेद होतो कीं, त्या कंडक्टरच्या एका धक्क्यासरशीं आमचीं फडणिशी पागोटीं हवेंत उडालीं व आम्हांलाहि आमची (म्हणजे ट्रॅमची) पायरी सोडणें प्राप्त झालें. रस्त्यांत उताणे पडणें सभ्यपणाचें नव्हे हें समजण्यापुरतें भान आम्हांला उरलें असल्यामुळें, आम्ही ताबडतोब उठलों. भोंवतालीं जमलेल्या लोकांनीं आमच्या नांवाचा जो मोठा जयजयकार चालविला होता, तो फारसा आनंदवर्धक नव्हता. विठूअण्णानें चिडून लोकांना दोन शिव्या झाडण्यास कमी केलें नाहीं; पण त्या ऐकून लोकांनीं आणखी आरोळ्या मात्र ठोकल्या. रस्त्यांत गरंगळून लांब गेलेलीं पागोटीं उचलून घेऊन लवकर रस्ता सुधारावा अशा सुविचारानें आम्ही पागोट्यांकडे वळलों; पण त्याच क्षणीं उलट दिशेनें जी एक ट्रॅम आली ती साफ आमच्या

पागोट्यांवरून गेली व ही वजनदार गरम इस्तरी त्या पागोट्यांच्या मानानें जरा न झेपण्याजोगी झाल्यामुळें, पानपतावर पडलेल्या शिपायांसारखीं तीं दोन पागोटीं उताणींपाताणीं झालीं. त्यांची दामटी व आमची फजिती झालेली पाहून समोंवतालच्या लोकांनीं एकच ओरडा केला; व त्या गर्दीतून कोणी तरी फेकलेले दगडहि आम्हांला लागले. मग मात्र संताप अनावर होऊन आम्हीहि उलट दगड मारूं लागलों. लोक धावले, आम्ही धावलों, ओरडा झाला, पोलिसांच्या शिट्या वाजल्या– इतक्यांत माझ्या कानशिलावर जबर मार बसून मी भोंवळ येऊन पडलों !

मी शुद्धीवर आलों तेव्हां इस्पितळांतल्या एका कॉटवर होतों. कॉटजवळ खुर्च्यांवर कुशाभाऊ, दाजीबा, रंगुकाका वगैरे बसले होते. मीं क्षीण आवा· जांत त्यांना विचारिलें,

" अण्णा कुठं आहे ? "

दाजीबा म्हणाले, " त्याचा डोळा फुटला आहे. तो तिकडच्या वार्डांत आहे."

" अरे अरे ! " मीं कण्हत म्हटलें.

" तुमच्या मूर्खपणाचे याहून विपरीत दुष्परिणाम झाले नाहींत हें नशीब !" दाजीबा म्हणाले, " गजूभाऊ, अरे काय वेड डोक्यांत घेतलंत् अन् काय भोग ओढून घेतलेत. अहो, कसलीं हिंदु वस्त्रं अन् कसलं शुद्धीकरण घेऊन बसलांत ? अहो, चार देशचीं माणसं एकत्र झालीं कीं, देवाण-घेवाण व्हाय-चीच साऱ्या गोष्टींत ! छे छे, तुमचा वेडेपणा—"

मला बोलवत नव्हतें, तरी मीं एकदम आवेशानें म्हटलें, " दाजीबा, आम्हां गरिबांना तुम्ही वेडे ठरवून मोकळे होतां, अन् भाषेचं शुद्धीकरण करायचा अट्टाहास जे करताहेत, त्यांचे मात्र तुम्ही थेर चालूं देतां ! देवाण-घेवाण सगळ्या गोष्टींत व्हायची, हा न्याय भाषेलाहि लागूं आहेच ना ? मग त्या शुद्धीकरणवाल्यांचा नाहीं कधीं दगडांनीं सत्कार केलांत—"

इतक्यांत नर्स आली व तिच्या इशाऱ्यामुळें मला बोलणें बंद करून स्तब्ध पडावें लागलें.

—किर्लोस्कर : दिवाळी-अंक, १९२९.

## मिरासदाराची लेक : : ५

मुंबई-पुण्याकडचे उतारू घेऊन जी गाडी "दामोदरवाडी" स्टेशनवर सकाळीं नऊ वाजतां येऊन आठ मिनिटें उभी राहत असे, तिच्या स्वागतार्थ दहा पंधरा माणसांहून अधिक माणसें क्वचितच हजर असत. लगीनसराईत आसपासच्या खेड्यांहून आलेलें वऱ्हाड सांगली मिरजेकडे जायचें असेल, किंवा पंढरपूरची यात्रा निघाली असेल, किंवा मिरजेस उरुस, नाहीं तर कोल्हापुरांत कुस्त्यांची मोठी दंगल असेल तर गोष्ट निराळी. एरव्हीं चार दोन शेतकरी, त्यांच्यामागोमाग भाकरीचीं फडकीं घेऊन डब्यांत शिरणाऱ्या चार बाया, आणि त्यांच्या कडेला माकडाच्या पिल्लांसारखीं चिकटलेलीं कच्चींबच्चीं, येवढेच "पासिंदर" फलाटावर उभे असायचे.

गाडीच्या वेळेस फलाटावर विशेष रहदारी दिसली कीं दामोदरवाडीच्या चाकूकात्र्यांच्या मोठ्या कारखान्यांतलीं माणसें या गाडीनें जायचीं आहेत, किंवा मुंबईपुण्याकडून येणाऱ्या कोणा तरी पाहुण्याला उतरून घ्यायला आलीं आहेत, असा स्टेशनमास्तर सहज तर्क करूं शकत. आणि त्यांचा तर्क सहसा चुकत नसे. आणि कारखान्याचे मालक बाबासाहेब दांडेकर यांच्या कुटुंबां-

तर्लीच माणसें स्टेशनवर आलेलीं दिसलीं म्हणजे तर, नुसता तर्क करण्यानें मास्तरांचें समाधान न होतां, हातांतलें काम टाकून फलाटावर जाऊन कोण निघालें आहे, किंवा कोण येणार आहे, त्याची वित्तंबातमी काढल्याशिवाय मास्तरना चैन पडत नसे.

आजहि मास्तर आपल्या गाभाऱ्यांतून बाहेर पडले असते; पण नक्की याच वेळीं मिरजेच्या सिग्नलरचा प्राण चालला होता कडकट्ट यंत्रावर, आणि त्याचा तो मेसेज खुद्द डी. टी. एस्. च्या कामाबद्दल असल्यामुळें तो सगळा घेतल्याशिवाय इलाज नव्हता.

मास्तरनीं हाक मारली, " बाजी ! "

पण उत्तर नाहीं.

" बाजी...... ! "

तरी उत्तर नाहीं.

" बाज्या ! "

मास्तरनीं बाजाच केल्यामुळें " जी " असें ओरडत पोर्टर आंत आला.

" लेका, होतास कुठें ? "

" दांडा बदलीत होतों नव्हं का... "

स्टेशनवरच्या चहावाल्याजवळची विडी मागून ओढीत असणें याला बाजीनें दांडा बदलणें असा प्रतिशब्द कायमचाच ठरवून टाकला होता. त्यामुळें धडधडीत खोटें बोलण्याबद्दलची त्याच्या मनाची शरम केव्हांच पार बुजून गेली होती. तो साफ खोटें बोले, आणि वर गमतीनें हसे.

आजहि तो त्याप्रमाणें हसला.

मास्तर एकीकडे हातानें " कड कड कट्ट " करीत म्हणाले,

" हां, बरं ! पण काय रे, आज बाबासाहेबांच्या घरचीं माणसं कां दिसताहेत आलेलीं ? "

" तीं व्हय ? तुमाला ठावं न्हाय ?... "

" कां ? "

" चंपूताई यायच्या हायती आज. कालिजाला सुटी झाली ना जनूं दिवाळीची. तवा मम्मईस्न येतायती."

"हां? मग काय बाबासाहेबांची नवी विलिस गाडी आली असेल स्टेशनवर लेकीला न्यायला!"

"तर जी! गाडी लई फाइन हय हां मास्तर! तिचं हारन म्यां दाबून पाह्यलं परवादिशीं तर असा आवाज झाला की, चार कोसावर भइरा उभा असला वाटंमंदी तर दूर होनार बगा! ताशीं दीडसे मैल पळतिया म्हनं! सायबानं आतां कमाल केली मास्तर!..."

"गाढव आहेस लेका. हं. बरं जा—गाडी यार्डात येईल बघ...."

बाजी धावला. पण गाडीपेक्षां बाबासाहेबांच्या चंपूताई पाह्यलाच तो अधिक अधीर झाला होता. गाडी आल्याचें जाहीर करण्यासाठीं त्यानें एका बाहलाला टांगलेल्या रुळाच्या तुकड्यावर जलद लयीची घंटा दिली, आणि सेकंड क्लासचा डबा ज्या जागीं रोज थांबत असे तिच्या अदमासानें उभ्या असलेल्या कारखान्याच्या मंडळींच्या पाठीशीं तो जाऊन उभा राहिला.

रुळांवरून "गरळम् गरळम्" असा विचित्र आवाज करीत आणि भपकारे सोडीत गाडी आली. चंपूताईच्या स्वागतार्थ आलेल्या माणसांपुढेंच सेकंड क्लासचा डबाहि नेमका उभा राहिला. पण सबंद डबा रिकामा! चंपूताई नाहींत! त्या दिसतांच हवेंत उडविण्यासाठीं कांहीं हातांत हातरुमाल तयार होते ते तसेच राहिले.

कारखान्याचे मॅनेजर पुटपुटले,

"म्हणजे! डब्यांत तर कुणीच नाहीं!"

इतर मंडळींनींहि आश्चर्य व्यक्त केलें.

"च्! सेकंड क्लासचा डबा तर एकच आहे!"

चंपूताईचा धाकटा तेरा चौदा वर्षांचा भाऊ "छब्या" आला होता. त्यानें मॅनेजरला म्हटलें.

"आमची ताई चक्रम् आहे!"

एकानें विचारलें, "बाबासाहेबांच्या देखत म्हणशील कां छब्या असं?"

"हो हो, पहा म्हणतों कीं नाहीं! परवां म्हणे मुंबईस कुठल्या कम्यूनिस्टांच्या सभेंत बोलली! बाबांना कळलं तर तेच म्हणतील तिला चक्रम्! उगं [illegible] कशाला...."

पुढें छब्या काय बोलणार होता कोणास ठाऊक? तें तसेंच राहिलें.

कारण मॅनेजरनीं एकदम धांदल करून म्हटलें.

"अरे त्या पहा, त्या पहा चंपूताई! थर्ड क्लासानं कशा आल्या? त्या पहा. चला."

मॅनेजर झटकले. इतर मंडळीहि लगबगीनें पुढें झाली. बाजीनें तर धूमच ठोकली. छब्या मात्र रेंगाळत निघाला. आपल्या बहिणीचें लोकांनीं येवढें काय स्तोम माजविलें आहे कोणास ठाऊक, असें तो मनाशीं म्हणत होता. मुंबईच्या कॉलेजांत बी. ए. च्या वर्गात असणें म्हणजे काय असा मोठा पराक्रम झाला, कीं सगळयांनीं तिला अगदीं फुलासारखें झेलावें! बाबांना तर वाटतें, आपली चंपूताई म्हणजे कोणी अद्वितीय बाई होणार आहे! तें कांहीं नाहीं. आपणहि अगदीं पहिल्या झटक्याला मॅट्रिक होऊन मुंबईच्या कॉलेजांत दाखल झालें पाहिजे! मग पाहूं आपल्याला लोक "छब्या, छब्या" कसें करतात तें! माझें कृष्ण असें चांगलें नांव असतांना तें वापरायला काय झालें या लोकांना? छब्या, छब्या काय करायचं कोणास ठाऊक!...

तितक्यांत त्याच्या कानांवर आलें.

"छब्या, ए छब्या! इश्श! बघा हो कसा आपल्याच तंद्रींत आहे."

लोकांनीं आपल्याला छब्या म्हणावें याबद्दल क्षणापूर्वी विषाद वाटून घेणाऱ्या छब्याला बहिणीच्या तोंडची ती प्रेमळ हाक ऐकतांच अत्यानंद झाला. तो एकदम हसत पुढें झाला. चंपूताईनें त्याला जवळ ओढून घेतलें तेव्हां त्याच्या मनांत आलें, छब्या म्हटलें म्हणून काय झालें, लोकांनीं? निदान आपल्या ताईच्या तोंडीं तरी ती हाक भारी गोड लागते! तिनें आपल्याला जन्मभर छब्या म्हणूनच हाक मारावी!...

त्यानें प्रेमभरानें वर पाहून बहिणीला म्हटलें,

"ताई, तूं जरा सुकल्यासारखी दिसते आहेस ग?"

मॅनेजरनीं चंपूताईला क्षणापूर्वी अगदीं हेंच म्हटलें होतें. म्हणून त्यांनीं मान तुकवून म्हटलें,

"पाह्यलंत!"

चंपूताई हसली व म्हणाली,

"इश्श! तुम्हीं सगळयांनीं कट केला आहे मला वाटतं मी वाळले आहे असं ठरवायचा!"

" दिसतेच आहेस तेव्हां म्हणणारच आम्ही!" छब्यानें म्हटलें.

" नाहीं बाई! वाळायला झालंय काय मला? प्रवासानं दिसत असेन मात्र थोडी."

त्याबरोबर छब्यानें एकदम विचारलें,

" खरंच ताई, तूं थर्ड क्लासनं कां आलीस?"

हा प्रश्न तिला विचारायचें सर्वांच्याच मनांत होतें, त्यामुळें तिच्या उत्तराकडे सर्वांचें लक्ष लागून राहिलें.

पण त्यांची निराशा झाली.

कारण, चंपूताईनें उडवाउडवी करून छबूला म्हटलें,

" अरे उगीच! म्हटलं थर्ड क्लासाच्या प्रवासाची गंमत एकदां पाहूं तरी!"

" अस्सं! मग मालगाडींतल्याहि प्रवासाची गंमत बघ कीं एकदां!"

छब्याच्या या कोटीमुळें मंडळींत मोठा हशा पिकला. चंपूताईदेखील मनःपूर्वक हसली व छब्याला शाबासकी दिल्यासारखें करून मंडळीकडे पाहत म्हणाली,

" अरे वा! आमचा छब्या मोठा कोटिबाज व्हायला लागला म्हणायचा!"

आणि यावर मॅनेजरकडे वळून " पण, आतां प्लॅटफॉर्मवरच किती वेळ काढायचा? चलूं या ना?" असें म्हणत तिनें पाऊल उचललें व आपण थर्ड क्लासनें कां आलों त्याचें उत्तर द्यावयाचें टाळलें.

पण आपल्या या थर्ड क्लासनें येण्याच्या विक्षिप्तपणाची चर्चा चंपूताईनें जरी टाळली, तरी ती दामोदरवाडींतल्या मंडळींनीं आपापसांत करायची त्याप्रमाणें केलीच. इतकेंच नव्हे तर खुद्द बाबासाहेबांच्या कानांवरसुद्धां ती बातमी गेल्यावांचून राहिली नाहीं, हें चंपूताईच्या लक्षांत लवकरच आलें.

कारण, दुपारचीं जेवणें झाल्यावर ते तिला म्हणाले,

" चंपूताई, आतां छब्याशीं कॅरम खेळत बसूं नकोस बरं का! पड आतां जरा. दमली असशील प्रवासानं. आज काय तूं थर्ड क्लासांतनं आलीस म्हणे!"

तें ऐकतांच चंपूताई कायसें पुटपुटून जी पळाली ती थेट आपल्या खोलींत. आपण थर्ड क्लासनें कां आलों तें वडिलांनीं विचारलें तर, आपल्या मनांतलें खरें कारण त्यांना स्पष्ट सांगण्याचा धीर आपल्याला होईल कीं नाहीं याची तिला खात्री नव्हती.

ती खोलींत जाऊन अंथरुणावर पडल्यावर मात्र तिचें मन तिला म्हणूं लागलें—

"तूं अशी घाबरते आहेस काय म्हणून? जे नवे विचार तुला पटूं लागले आहेत, आणि ज्या नव्या विचारांची अंमलबजावणी करायच्या हेतूनें तूं थर्ड क्लासमधून आलीस, ते बाबांजवळ बोलून दाखवायला असं भिऊन काय उपयोग? त्या विचारांची शरम का वाटते तुला?"

हा शरमेचा आरोप चंपूताईला सहन करवला नाहीं. ती चटकन् आपल्या मनाला म्हणाली,

"छे-छे! शरम काय म्हणून? लवकरच मी बाबांना सारं सांगणार आहे..."

* * *

ती आपल्या मनाला असं म्हणाली खरी, पण तिला घरीं येऊन पंधरा दिवस झाले तरी तिनें बाबासाहेबांजवळ आपल्या मनांतल्या नव्या विचारांविषयीं एक चकारशब्दहि काढला नाहीं; मग "साऽरं" सांगणें तर बाजूलाच राहिलें.

कारण, ज्या विचारांच्या लाटेंत ती सध्यां सापडली होती ते आपल्या बाबांना मुळींच रुचायचे नाहींत असें तिला भय वाटत होतें, हें नाकबूल करण्यांत अर्थ नव्हता. गेल्या दोन अडीच महिन्यांत मुंबईच्या कम्यूनिस्ट पंथांतल्या एका तरुण मुलीची, व तिच्यातर्फे दोन चार तरुण मुलांची ओळख होऊन व ती वाढत जाऊन, चंपूताईनें त्या पंथाचें बरेंच वाङ्मय वाचलें होतें. तिच्या तरुण, भावनासुलभ मनावर त्या वाङ्मयाचा बराच परिणाम झाला होता. तिच्या नव्या मित्रमंडळींत बाबू गोंधळेकर नांवाचा एक तरुण होता. तो तिला म्हणे, "चंपूताई, तुम्हीं नुसतं आमचं वाङ्मय वाचून स्वस्थ बसतां कामा नये! तुम्हीं आपल्या वडिलांवर आपल्या कम्यूनिस्ट मतांचा पगडा बसविला तरच तुमची शाबास. कारण तुमचे वडील म्हणजे नमुनेदार मिरासदार आहेत. मिरासदाराची एक लेक म्हणूनच आम्ही तुम्हांला ओळखतों. तुम्हांला आम्ही खऱ्या कम्यूनिस्ट केव्हां म्हणूं माहीत आहे? तुम्ही जेव्हां खरोखरच कम्यूनिस्टसारख्या प्रत्यक्ष वागूं लागाल, अन् दामोदरवाडीचा कारखाना आज मिरासदारीनें चालला आहे, तो कामगारांचा

कारखाना करायला आपल्या वडिलांना भाग पाडाल, तेव्हां! तुमच्याकडे आमचे डोळे लागून राहिले आहेत!"

बाबू गोंधळेकराच्या या बोलण्याचा तर तिच्या मनावर फार परिणाम होई. हा गोंधळेकर सात वर्षांपूर्वी अकाउंटंट म्हणून दामोदरवाडीस नोकर होता व त्यानें पैशाची अफरातफर केली म्हणून बाबासाहेबांनीं आपल्या उग्र स्वभावास अनुसरून त्याला रातोरात हाकून दिलें होतें, हें चंपूताईस माहीत नव्हतें. तें असतें तर बाबासाहेबांना मिरासदार म्हणून शिव्या देतांना बाबूला एवढा आवेश कां चढतो तें तिला उमगलें असतें. पण तें तिला माहीत नव्हतें, आणि बाबू तर तिला व इतरांनाहि उलट सांगे, "मी दामोदरवाडीची नोकरी कां सोडली माहीत आहे? हिशोबाच्या खोट्या वह्या करून भागीदारांना फसवायचे अन् कामकऱ्यांचे पगार बुडवावयाचे बाबासाहेबांचे डाव जेव्हां मला कळलें, तेव्हां मीं त्यांना सांगितलें, हा माझा राजीनामा घ्या. मिरासदारीच्या या असल्या पापाचा साक्षी होण्यापेक्षां उपाशी मेलों तरी बेहेत्तर!"

गोंधळेकर असलें कांहीं बहकला कीं त्याचा तीव्र शब्दांनीं इन्कार केल्याशिवाय चंपूताई राहत नसे. पण हीं बोलणीं सोडलीं तर तिला इतकें मात्र पटे कीं, ज्या अर्थी दीड दोनशें कामगाराचा अवाढव्य कारखाना चालवून आपले बाबा आज श्रीमंतींत नांदताहेत, त्या अर्थी त्यांना 'मिरासदार'च म्हटलें पाहिजे. आपण जर कम्यूनिस्ट पंथ स्वीकारणार असलों, तर अगदीं पाहिला प्रश्न असा कीं, आपल्या बापाचा मिरासदारपणा आपण मुकाट्यानें चालू द्यायचा का?"

कामगारवर्ग, कामगारांची उन्नति, प्रत्येक माणसानें कामगार बनण्याची आवश्यकता वगैरे शब्द चंपूताईला दोन अडीच महिन्यांत पाठ झाले होते. त्या तसल्या शब्दांचा परिणाम झाल्यानेंच ती मुंबईहून दामोदरवाडीस आली ती नेहमींप्रमाणें सेकंड क्लासनें न येतां थर्ड क्लासनें आली होती. आणि वाचून व ऐकून पाठ केलेल्या त्या शब्दांच्या साहाय्यानेंच बाबासाहेबांशीं केव्हां तरी संधि साधून वाद करावयाचें तिनें मनाशीं ठरविलें होतें.

पण पंधरा दिवस उलटले तरी योग्य संधि तिला दिसली नाहीं. दिसली

नाहीं कसची म्हणा ? योग्य संधि कितीदां आली तरी बाबासाहेबांजवळ विषय काढायचा तिच्या मनाचा हिय्या झाला नाहीं हेंच खरें.

*   *   *

अखेर दिवाळी अगदीं दोन दिवसांवर आली. आणि जो वाद बाबासाहेबांशीं करावयाचा चंपूताईला हिय्या होत नव्हता त्याची तालीम कारखान्याच्या मॅनेजरशीं करून पाहण्याचा मोका तिला अकल्पितपणें मिळाला.

ती सहज कांहींसें टाईप करून घेण्यासाठीं म्हणून मॅनेजरांच्या ऑफिसांत गेली, आणि त्याच वेळीं दिवाळीच्या सुटीची नोटीस कारखान्यांत फिरवायला हवी म्हणून मॅनेजरांच्या सांगण्याप्रमाणें टाइपिस्ट लिहून काढीत होता. चंपूताईच्या समक्षच ती नोटीस सांगून व लिहून झाल्यामुळें तिला ती समजली. नोटीस सगळीकडे फिरवायसाठीं पोऱ्या घेऊन गेला. तेव्हां बरोबर आणलेलें काम करावयासाठीं टाइपरायटरजवळ बसायचें सोडून चंपूताई मॅनेजरना म्हणाली,

"अण्णा, एक गोष्ट विचारूं का तुम्हांला ?"

"हो-हो, अवश्य."

"दिवाळीची सुटी किती दिलीत कामकऱ्यांना ?"

"फक्त एक दिवस."

"ती तरी कुठें ! त्या दिवशींसुद्धां सकाळीं अन् संध्याकाळीं एक एक तास कारखाना चालू राहील असं फर्मान काढलं आहांत."

"तसं करण्यांत मतलब आहे..."

एकदम जिंकल्यासारखें करून चंपूताई म्हणाली,

"मला तेंच सुचवायचं आहे. तुम्ही आपला तेवढा मतलब पाहतां. म्हणूनच मग लोक तुम्हांला मिरासदार—कॅपिटॅलिस्ट म्हणायला लागतात."

"कोण म्हणतो ! तो बाब्या गोंधळेकर म्हणत असला तर त्याला कान पकडून..."

एकदम बाबूचेंच नेमकें नांव अण्णांनीं घेतल्याचें पाहून चंपूताईला बराच विस्मय वाटला. ती म्हणाली,

"त्याचा कान कशाला धरायचा ! तुम्हीच आपल्या तोंडानं आतां कबूल

केलंत कामगारांना पुरती एक दिवसाचीसुद्धां सुटी न देण्यांत मतलब आहे म्हणून."

" मतलब आहे म्हटलं. पण चंपूताई, आमचा स्वार्थी मतलब नाहीं... कामकऱ्यांचाच आहे."

" हः! मिरासदारांची ही भाषा ठरलेली आहे."

अण्णांनीं एकदम आश्चर्यानें चंपूताईकडे पाहिलें व म्हटलें,

" म्हणजे ? चंपूताई, तुम्ही कम्यूनिस्टांच्या तोंडची अगदीं नगदी भाषा बोलायला लागलांत! घेतलीत कीं काय दीक्षा ?"

" त्याच्याशीं काय करायचं आहे? कामकऱ्यांच्या कळकळीची सबब सांगायची, अन् त्यांना सणावाराचीसुद्धां धड सुटी द्यायची नाहीं. असले जुलूम आपल्या वाडींत चालतात येवढं समजलं मला."

" चंपूताई, याला जुलूम कसा म्हणतां ?"

" मग तुम्ही तरी याला कामकऱ्यांचं हित कसं म्हणतां ?"

" हां. असं विचारा. सांगतों. पहिली गोष्ट अशी चंपूताई, कीं दर रविवारीं आम्हीं सबंद सुटी देतों, अन् दिवाळीसारख्या सणाला देत नाहीं. तेव्हां त्यांत कांहीं तरी हेतु आहे. तो हेतु असा, कीं सणासुदींत सबंध दिवसाची सुटी मिळाली कीं, कामकरी सांगली-मिरजेकडे धावतात, दारू पिऊन घरीं येतात, बायकापोरांना मारतात अन् पुढें एक दोन दिवस कामावरहि न येऊन आणखी बुडतात असा आम्हांला पुष्कळदां अनुभव आला. दारूच्या पिप्यांत गेल्याशिवाय सणच साजरा होत नाहीं, अशी कामकरीवर्गाची अजून समजूत आहे. रविवारची सबंध सुटी मिळाली तरी त्यांना फारशी दारूची आठवण व्हायची नाहीं, पण सणाच्या दिवशीं जर का सबंध दिवसाची मोकळीक मिळाली, कीं दारूचा गुत्ता असेल अशा गांवीं त्यांनीं धूम ठोकलीच! म्हणून बाबा-साहेबांनीं ठरवलं कीं, सणांच्या दिवशीं सकाळीं अन् संध्याकाळीं कामकरी कारखान्यांत गुंतलेले राहतील असं करायचं. यांत आमचा स्वार्थी मतलब तो काय साधला आम्हीं ?"

" नाहीं कसा ?" चंपूताई म्हणाली, " त्यांना सणासुदीचं दोन तास खपवून फायदा अखेर तुमच्याच घशांत टाकणार तुम्ही !"

हें म्हणतांना "भलं पकडलं" अशा अर्थीं तिनें उजव्या हाताची तर्जनी आणि मान हलविली.

तो तिचा अभिनय पाहून मॅनेजरना हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. ते म्हणाले,

"हाहि तुमचा तर्क चुकीचा आहे. सणासुदीच्या दिवशीं कामगारांना त्या दिवसाच्या कामाचा सारा फायदा मिळावा अशी बाबासाहेबांनीं योजना केली आहे. दोन तासांत किती माल तयार होतो, अन् त्याच्यावर किती नफा उरतो त्याचा हिशोब काढून तो कामगारांत वाटला तर कशी वाटणी पडेल तें आम्हीं ठरवलं आहे. दर सणाच्या दिवशीं प्रत्येक कामगाराला त्याच्या पगारावर दहा टक्के बोनस देतों आम्ही."

वादांत पराजय झाला कीं माणूस कांहीं तरी खुसपट काढतोच, या न्यायानें चंपूताई म्हणाली,

"पण येवढं सव्यापसव्य करण्यापेक्षां कामगारांना वेळोवेळीं बक्षिशी म्हणूनच रक्कम उचलून दिली तर काय बिघडेल.... ?"

"बिघडेल!" अण्णा गंभीर चेहरा करून म्हणाले, "अगदीं खास बिघडेल. तुम्ही एक गोष्ट लक्षांत ठेवा चंपूताई, कीं कष्ट न करतां कामगारांना एकदां तुम्हीं धर्म म्हणून पैसा दिलात, कीं ते पुन्हा तुमच्या धर्मासाठीं अडून बसतील, अन् काम सोडतील! त्यांना पैसा तर पोंचता करायचा, पण तो आपल्याला मोफत मिळाला असं तर त्यांना वाटूं द्यायचं नाहीं, हें धोरण बाबासाहेबांनीं नेहमीं राखलं आहे बरं, चंपूताई! उगीच कोणाचं कांहीं ऐकून तुम्हीं विकल्प आणूं नये मनांत!..."

"इश्श, विकल्प कसला? पण आपलं विचारलं..." असें चंपूताईनें अखेर म्हटलें, व ती आपलें काम करून घरीं निघाली तेव्हां तिच्या मनाचा बराच गोंधळ उडाला होता.

एक मन तिला म्हणे, आपले वडील कामकऱ्यांना लुबाडतात, फसवतात, पिळून काढतात असा ओरडा करणाऱ्या लोकांचा तरी तो करण्यांत स्वार्थ नसेल कशावरून? अण्णांनीं जें आत्तां सांगितलें त्यावरून आपले वडील कामकऱ्यांच्या हिताला जागतात असें नाहीं का दिसत?...

पण दुसरें मन तिला म्हणे, आपले वडील घेतात त्याहून कामकऱ्यांची अधिक काळजी घेणें शक्य नाहीं का? आणि असेल तर मग आपल्या वडिलांवर मिरासदारीचा थोडा तरी आरोप येतोच की नाहीं?

* * *

ती घरीं पोचते तों तिच्या गोंधळलेल्या मनाचा अधिकच गोंधळ उडावा असें दृश्य तिला दिसलें.

जानू सुतार कोपऱ्यांत बसून रडत होता, आणि बाबासाहेब संतापून ओरडत होते,

"हं, जान्या! ऊठ, अन् चालूं लाग मुकाट्यानं! तुझ्या या रडण्या-भेकण्याचा कांहीं एक उपयोग व्हायचा नाहीं बघ!"

जानू हुंदके देत म्हणाला,

"मालक, तुमच्या पायाची शप्पत दिऊन सांगतु उद्यां तासगांवचा सावकार यऊनशान माझी भांडीकुंडी भाइर काढील. गरिबाचा दिवाळसन रस्त्यावर लेकरं उगडीं नागडीं अन्नावीण तरफडुन साजरा व्हइल! शप्पत घेतों तुमच्या पायाची मालक! लई न्हाइ, साठ रुपये द्या. पायाशपत..."

यावर बाबासाहेब अधिकच रागावून ओरडले,

"उगीच शपथ शपथ करूं नकोस, जान्या. तुला कर्ज झालं आहे हें आधीं मला खरं वाटत नाहीं. दहादा तुला सांगितलं, तुझ्या बायकोला घेऊन ये, अन् तिच्या तोंडून मला कळूं दे कर्ज झालं आहे म्हणून. तर तें तुला कबूल नाहीं! तासगांवच्या सावकाराची निवळ थाप आहे तुझी माझ्यापासून पैसे उकळायपुरती! — हां, बोलूं नको मधेंच! गप्! अरे गप् म्हटलं ना! अन् खरोखरच तूं सावकाराचं कर्ज केलं असलंस तर तुला तें फेडायला पैसे द्यायच्या ऐवजीं तुझी दामोदरवाडींतल्या कामकऱ्यांपुढें धिंड काढून शिक्षा दिली पाहिजे! कांहीं तरी व्यसन केलं असलं पाहिजेस तूं! नाहीं तर कर्ज व्हायचं कारण काय तुला? माझ्या कारखान्यांतल्या कोणत्याहि कामकऱ्याला कधीं सावकाराचं तोंड पाह्यचं कारण पडायचं नाहीं अशी मीं व्यवस्था ठेवली आहे. पगार भरपूर मिळतो, दहावी तारीख पगारावांचून टळत नाहीं, सुगीसुदीला बोनस हातीं येतं, कार्य निघालं तर सोसायटीकडनं कर्जाऊ रक्कम मिळते, औषधपाणी बारा महिने मोफत मिळतं— खरं आहे की नाहीं हें सारं?"

"होय मालक, पर शप्पत देतु सावकार मानीवर बसलाया! येवढ्या वकताला हात द्या धनी, पुना कदी सावकाराच्या दाराला जानार न्हाई... साठ रुपये द्या..."

"साठ कवड्या मागितल्यास तरी मिळायच्या नाहींत, जान्या! अरे, तूं पुन्हा गळा काढलास का? जान्या, तूं आतां चालता झाला नाहींस तर पहारेवाल्याला बोलावून त्याच्याकडून घालवीन तुला! ऊठ! आटप! अस्सं! —चल जा कामावर!—"

चंपूताईनें हा सारा प्रकार पाहिला.

आपल्या बापाचें वागणें तिला बरें वाटलें नाहीं. ती मनांत म्हणाली, "यालाच म्हणतात मिरासदारी!"

तिला जानू सुताराची फार करुणा आली.

कारखाना सुटला तेव्हां वाटेवर टपून बसून तिनें जानूला एकीकडे गाठलें, व बरोबर आणलेल्या साठ रुपयांच्या नोटा त्याच्या हातीं ठेवल्या.

परत येतांना ती मनाशीं म्हणत होती,

"जानूला ही मीं मदत केली हिचे सुपरिणाम होऊं देत, म्हणजे मग बाबांशीं करूं वाद! बाबांची असली म्हणून काय झालं, मिरासदारी ती मिरासदारीच! तिचे वाभाडे काढलेच पाहिजेत मला!"

* * *

दिवाळी संपून दोन दिवस झाले होते. चंपूताई एका मासिकाचा अंक घेऊन पुढच्या अंगणांत झाडाखालीं खुर्चीवर बसली होती.

तिनें मध्येंच सहज रस्त्याकडे पाहिलें, तों कारखान्याच्या रखवालदारानें व इतर पाहरेकऱ्यांनीं जानू सुताराला व आणखी पांच-सहाजणांना दंडाला धरून बाबासाहेबांच्या कचेरीकडे चालविलें होतें.

ती हलकेच मागोमाग गेली व वडिलांच्या ऑफिसांत न शिरतां बाहेर ऐकत उभी राहिली.

बाबासाहेबांनीं खाडकन् जानूच्या तोंडांत भडकवल्यासारखें तिला ऐकूं आलें, आणि त्यांचे शब्द खणाणले,

"जान्या गाढवा! तासगांवला जाऊन चार दिवस दारू पीत पडलास काय? घरीं बायको अन् पोरं दिवाळीचीं उपाशी टाकलीस, अन् तूं तिकडे

शेण खात उकिरड्यावर लोळत होतास! अन् बरोबर सुतार खात्यांतल्या या पांचसहा गाढवांनाहि घेऊन गेला होतास काय? याचसाठीं तुला त्या दिवशीं माझ्याजवळनं साठ रुपये हवे होते, नाहीं! बेवकूब!"

पुन्हा खाडकन आवाज झाला.

"चुकलों मालक! मारूं नका!" जानू ओरडला.

बाबासाहेबांनीं पुन्हा त्याच्या तोंडांत लगावली व म्हटलें,

"आधीं होता वाघ्या, मग झाला पाग्या—त्याचा येळकोट जाईना! तासगांवला भिकेला लागला होतास दारूपायीं तो तुला मी इथें आणून मार्गाला लावला दोन वर्षांपूर्वी! पण तुझा येळकोट आहेच अजून! याचसाठीं मागत होतास साठ रुपये नाहीं!"

पुन्हा तोंडांत मारल्याचा आवाज झाला.

जानू विवळला.

बाबासाहेबांनीं विचारलें,

"काय रे गद्धया, तुला पैसे कोणी दिले येवढे? आं? बोल!"

हे शब्द ऐकतांच चंपूताईच्या अंगाचा थरकाप उडाला.

जानूचें उत्तर ऐकण्याचा धीर तिला झाला नाहीं.

ती जी पळाली ती घरीं येऊन आपल्या खोलींत अंथरुणावर पडली.

तिचा ऊर धडधडत होता, मस्तकांत घाव पडत होते, आणि तिचें मन म्हणत होतें—

"बंधुप्रेम अन् दया हीं सदाचाराचीं मूलतत्त्वंच खरीं! पण सदाचारसुद्धां या जगांत आंधळ्यासारखा डोळे झाकून करतां येत नाहीं म्हणायचा!"

—किर्लोस्कर : मे १९३३.

---

## 'संप बरं! हा संप!' : : ६

संध्याकाळीं साडेपांच वाजतां 'व्हर्नान' कंपनीच्या इमारतींतून वामनराव बाहेर पडले. हुश् हुश् करीत वामनरावांनीं डोक्यावरची टोपी काढली आणि कोटाच्या गुंड्या मोकळया केल्या. 'व्हर्नान' कंपनीच्या फोटोच्या कार-खान्यांत सकाळीं १० वाजल्यापासून आतांपर्यंत काम करून करून त्यांच्या मानेचा कणा दुखूं लागला होता. कारखान्यांतील त्या अंधाऱ्या खोलींत बसून बसून त्यांचें मन किंचित् उद्विग्नहि झालें होतें. परंतु इमारतीच्या बाहेर पडतांच वाऱ्याची एक सुंदर झुळुक त्यांच्या शरीराला स्पर्श करून गेली, आणि तीमुळें वामनरावांचें मन एकदम सुप्रसन्न झालें. शिवाय, कोटाच्या गुंड्या काढतां काढतां आजच मिळालेल्या पगाराच्या ८० रुपयांचा आंतील खिशांत आवाज झाला; आणि तो कर्णमधुर ध्वनि ऐकतांच वामनरावांची मुद्रा एकदम प्रफुल्लित होऊन त्यांनीं मोठ्या आनंदानें सभोंवारच्या गोंगाटा-कडे दृष्टि टाकली.

वामनरावांचें वय पंचवीस सव्वीस इतकेंच होतें. ते जरासे ठेंगणे ५ अंगानें किंचित् आडवे असून त्यांच्या दृष्टींत चांचल्य विशेष होतें. त्यांच्या

पोषाखाकडे पाहिलें तर जुन्या चालीच्या माणसाचें फॅशनेबल माणसांत पर्यवसान होत असतांना त्याचा जसा पोषाक असतो तसा त्यांचा होता हें चटकन दिसलें असतें. त्यांनीं डोक्यावर केस वाढविले होते, परंतु ते केस नीटनेटके व व्यवस्थित नसून पावसाळ्यांत रानोमाळ उगवणाऱ्या गवताप्रमाणें फिसकारलेले व वेडेवाकडे कापलेले होते. डोक्यावरून काढून हातांत घेतलेली त्यांची टोपी साहेबी होती; परंतु ती किती तरी मळलेली आणि रंगहीन झालेली दिसत असल्यामुळें, वामनरावांनीं ती चोरबाजारांत सेकंडहँड घेतली असावी असा त्यांच्या जिवलग मित्रालाहि संशय आला असता. गळ्यांत कडक कॉलर घालण्याचा त्यांचा पहिलाच प्रसंग असल्यामुळें त्यांना आजूबाजूस बघतां येत नव्हतें. "सज्जनपणा म्हणजे नेहमीं सरळ दृष्टि ठेवून, वाकड्या नजरेनें कोणत्याहि गोष्टीकडे न पाहतां आयुष्य घालविणें" हें तत्त्व वामनरावांच्या रूपानें मूर्तिमंत अवतरल्यासारखें वाटत होतें. रोज आमचे वामनराव नेकटाय घालीत असत, परंतु आज कोर्टांत जाण्यापूर्वी सुमारें अर्धा तास धडपड करूनहि कडक कॉलरीवरून नेकटाय बांधण्याचा त्यांचा प्रयत्न यशस्वी झाला नव्हता. वामनरावांनीं नुकताच एक गरम कोट शिवला होता. चांगला कोट शिवण्याच्या कामीं गोव्याचे शिंपी फार पैसे घेतात म्हणून काटकसरीच्या दृष्टीनें त्यांनीं कांदेवाडीच्या नाक्यावरल्या एका शुचिर्भूत हिंदु शिंप्यावरच तें काम सोपविलें होतें. आणि त्या शिंप्यानें त्या कोटाच्या बाबतींत अशी कांहीं शिताफी व हातचलाखी दाखविली होती कीं, वामनरावांच्या अंगावर असलेला कोट ओव्हरकोट आहे कीं रेनकोट आहे अशी अनेक लोकांची चुकभूल होत असे. वामनरावांच्या पायांतील विजार अगदीं बिलकुल चांगली होती. पायांतील बुटांकडे पाहावयाचें धाडस मात्र कोणी करूं नये—

आणि त्यांच्या बुटांशीं आम्हांला करावयाचें आहे काय?

आम्हीं वर सांगितलेंच आहे कीं, एकदोन करणांमुळें वामनराव आनंदित झाले; परंतु त्यांच्या आनंदाचें मुख्य आणि महत्त्वाचें कारण सांगावयाचें राहिलें. गेल्या मे महिन्यांत वामनरावांनीं गृहस्थाश्रमाची दीक्षा घेतली होती. त्यांचें सासुरवाड पुण्यास होतें. लग्न झाल्यापासून आतांपर्यंत त्यांची व पत्नीची पुन्हा भेटच झाली नव्हती, व मुंबईस चांगलीशी जागा मिळाली नसल्यामुळें वामनरावांनींहि पत्नीस आणण्याचा विशेष विचार केला नाहीं; परंतु चारपांच

दिवसांपूर्वी कॉन्ट्रॅक्टरच्या एका चाळींत त्यांना दोन खोल्या मिळाल्या होत्या, व त्याबरोबर त्यांनीं "सौभाग्यवती"स पाठवून देण्याविषयीं श्वशुरांस पत्र टाकलें होतें. त्यानंतर पोस्टमनांचा संप झाल्यामुळें सासुरवाडचें उत्तर वामनरावांना मिळालें नव्हतें. आज पत्र येईल असें म्हणून ते दररोज मार्गप्रतीक्षा करीत बसत, परंतु रोजच्या रोज त्यांची निराशा होई. आज पहाटे पत्र आल्याचें त्यांना स्वप्न पडलें होतें. पहाटे पडलेलीं स्वप्नें खरीं ठरतात अशा विश्वासानें वामनरावांनीं पोस्टमन चाळींत येण्याची वाट न पाहतां सकाळीं उठल्याबरोबर पत्रांचा बटवडा करणाऱ्या नवख्या इसमाकडे धाव घेतली. परंतु त्यांच्या नांवाचें एकहि पत्र त्या पोस्टमनच्या अवाढव्य पोतडींत सापडलें नाहीं. संध्याकाळीं पत्र खास येणार अशी मनाची समजूत घालून वामनराव कामावर गेले, आणि आत्तां "व्हर्नान"च्या इमारतीबाहेर आल्यावर त्या पत्राचाच विचार आल्यामुळें ते जरासे खूष झाले होते.

आपण आतां घरीं जाऊं तों आपल्या खोलींत पत्र कसें अगदीं आपली वाट पाहत पडलेलें असेल अशी वामनरावांना फार आशा होती. ही त्यांची आशा इतकी तीव्र होती, आणि पहाटे पडलेल्या स्वप्नानुसार पत्र येणार असा त्यांचा इतका दृढ विश्वास होता कीं, त्यांना वाटूं लागलें आपण आतां रखडत रखडत अर्ध्या पाऊण तासानें घरीं जाऊन नंतर पत्र वाचणार हें कांहीं चांगलें नव्हे. इतक्या महत्त्वाच्या पत्राच्या बाबतींत अशी दिरंगाई करणें मुळींच प्रशस्त नाहीं. या भराभर धावणाऱ्या एखाद्या 'टामरेळींत' जर आपण उडी मारली तर दहा-पंधरा मिनिटांत आपल्या हातांत पत्र पडेल. म्यूझिअम वेस्टकडून गिरगांवकडे धाव घेणाऱ्या "टामरेळी"कडे पाहत असतां वामनरावांच्या डोक्यांत वरील विचार आला, आणि आंतील खिशांत ठेवलेल्या पगाराच्या पैशांकडे त्यांचा हात जाऊन हाताला गरम स्पर्श झाल्याबरोबर तो विचार कायम झाला. झटकन् पुढें होऊन त्यांनीं धावत्या "टामरेळी"च्या दांड्याला धरून त्यांच्या शरीराला व पोषाखाच्या ऐटीला साजेल अशा कुशलतेनें आंत पाऊल टाकलें.

ट्रॅममध्यें बसल्या बसल्या वामनरावांनीं विचार केला कीं, 'सौभाग्यवती'ला पाठवून देतों असें श्वशुरांचें पत्र आलें असल्यास आपल्या पत्नीच्या आगमनाची काय काय तयारी करावयास पाहिजे. कॉन्ट्रक्टरच्या चाळींत

मिळालेल्या खोल्या झाडून वगैरे स्वच्छ करण्याचें काम त्यांनीं कधींच उरकून टाकलें होतें. त्याचप्रमाणें थोडेंसें धान्य, कडधान्य व इतर किराणा मालहि त्यांनीं आणून खोल्यांत व्यवस्थित ठेवून दिला होता. आणि पत्नी आल्या-नंतर आपली दक्षता पाहून तिला केवढा आनंद व अभिमान वाटेल अशा विचारानें त्यांना गेल्या आठवड्यांत अगणित वेळा गुदगुल्या झाल्या होत्या. परंतु याहिपेक्षां कांहीं अधिक तयारी करावयास पाहिजे कीं काय असा विचार करीत, ट्रॅमच्या खिडकीबाहेर काढलेलें डोकें खाजवीत वामनरावांनीं आपला गिरगांवनाक्यापर्यंतचा प्रवास संपविला. नाक्यावर गाडी थांबतांच उतर-णाऱ्या व चढणाऱ्या माणसांच्या गडबडीमुळें ते आपल्या गहन विचारांतून जागे होऊन ट्रॅममधून उतरले, व थोडेंसें पुढें चालत जाऊन आपल्या नव्या चाळींत शिरले.

जिन्याच्या दोन दोन पायऱ्या एकेका वेळीं ओलांडून धापा टाकीत वामनराव आपल्या खोलीच्या दाराशीं येऊन पोंचले. घाईघाईनें कुलूप काढून धाडदिशीं दार लोटून ते पाय टाकतात तोंच उंबऱ्याच्या आंतील बाजूस एक पाकीट पडलेलें त्यांना दिसलें. तें पाकीटपत्र दिसतांच त्यांना इतका हर्ष झाला कीं, त्या हर्षाच्या आवेगानें त्यांच्या विजारीच्या व कोटाच्या गुंड्या आणि बुटाच्या लेसांचे बंद तटातट तुटले असतील. त्यांनीं तें पत्र चटकन उचललें व वरचा पत्ता वाचला—

V. G. Joshi Esq.

Girgaum, Bombay.

असा इंग्रजी पत्ता वाचून वामनरावांच्या मनाची थोडीशी निराशा झाली. कारण त्यांचे श्वशुर त्यांना नेहमीं मोडींत पत्रें लिहीत असत. तेव्हां हें पत्र सासुरवाडीचें नव्हेच कीं काय अशी शंका आल्यामुळें, त्यांनीं पोस्टाचा स्टॅंप निरखून पाहिला. तो स्टॅंप तर पुण्याचा!— मग पत्र श्वशुरांचें खास!... इंग्रजींत लिहिलें असेल सहज हौसेनें!

मनाशीं अशा प्रकारचीं प्रश्नोत्तरें करीत वामनरावांनीं पाकीट फोडलें, व आंतील मजकूर वाचण्यास सुरुवात केली. पत्र इंग्रजींत होतें व त्याचा मति-तार्थ असा होताः—

आपलें पत्र पावलें, मजकूर समजला......चि. सौ. इंदिराबाईस ऋतु...

तेव्हां योग्य ते धर्मविधि वगैरे करण्यासाठीं उद्यांच्या शनवारीं रात्रीं निघून रविवारला येथें यावें...उत्तर पाठविण्यास उशीर झाल्याबद्दल क्षमा असावी... आपली मित्रमंडळी आपल्याबरोबर आल्यास आनंद होईल. वगैरे वगैरे...'

पत्र वाचून वामनरावांना काय वाटलें असेल हें सांगणें फार जबाबदारीचें आहे. तरी फक्त "सौभाग्यवती"स पाठवावें अशा अर्थाच्या पत्राला अशा प्रकारचें उत्तर आलेलें पाहून 'आंधळा मागतो एक डोळा व देव देतो दोन' असा विचार त्यांच्या मनांत आला असला पाहिजे असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं.

पत्र वाचून जरी वामनरावांस आनंद झाला तरी एक प्रश्न त्यांच्या मनापुढें पुनः पुन्हा येत होता. आजपर्यंत ज्या श्वशुरांनीं एकदाहि इंग्रजींत पत्र लिहिलें नव्हतें त्यांनीं आजच इंग्रजीची येवढी आवड कां दाखवावी... बाकी आजपर्यंत आपल्याला सासऱ्यांकडून अशीं पत्रें आलीं किती!... सारीं तीन ...मग त्या तीन पत्रांवरून कांहीं अनुमान काढतां येत नाहीं. आणि शिवाय हा प्रसंग जरासा 'असा' असल्यामुळें इंग्रजींत पत्र लिहिणें अधिक प्रशस्त वाटणें साहजिक आहे.

याप्रमाणें एका शंकेची विल्हेवाट लागली तरी दुसरी एक शंका वामनरावांच्या मनांत डाचतच होती. श्वशुरांच्या पत्राच्या शेवटीं मित्रमंडळींना घेऊन येण्यासंबंधींचें जें वाक्य होतें त्याची संगति कांहीं केल्या लागेना. कारण वामनरावांना अगदीं सलगीचे मित्र असे कोणीच नव्हते, आणि सासऱ्यांना माहीत असण्याइतकी जिवलग मैत्री तर त्यांची कोणाशींच नव्हती. नाहीं म्हणावयास लोणावळ्यास त्यांचा एक आतेभाऊ राहत असे. त्याशिवाय वामनरावांना कोणी आप्तसंबंधींहि नव्हते व मित्रहि नव्हते. मग सासऱ्यांनीं असें कां लिहावें? या प्रश्नाचा वामनरावांनीं पुष्कळ विचार केला पण नीटसा उलगडा कांहीं होईना. शेवटीं, आनंदाचा प्रसंग म्हणून श्वशुरांनीं तसें लिहिलें असेल असें मनाचें समाधान करून या दुसऱ्याहि शंकेचें त्यांनीं निराकरण केलें.

लोणावळ्याच्या आतेभावाचें स्मरण होतांच त्यांच्या मनांत थोडीशी काळजी उत्पन्न झाली. कारण त्या आतेभावाचा थोरला मुलगा बाबूराव गेले ऱ्हाबार दिवस विषमानें आजारी होता. त्याच्याकडलें पत्रहि पोस्टाच्या संपामुळें मिळालें

नव्हतें. तेव्हां बाबूरावाची प्रकृति कशी काय असेल अशा चिंतायुक्त विचारानें वामनराव किंचित् अस्वस्थ झाले. परंतु आजच्या पत्रानिमित्त काळजी, चिंता, निराशा वगैरे सर्व गोष्टींना मनाबाहेर काढून लावावयाचें असा त्यांचा बेत असल्यामुळें तो विचार तेवढ्यावरच राहिला, आणि उद्यां रात्रीं पुण्यास जावयास निघावयाचें तेव्हां काय काय तयारी करावयास पाहिजे त्याचा विचार त्यांनीं सुरू केला.

शनिवार उजाडला. रोजच्यापेक्षांहि अधिक घाईनें स्नान व भोजन उरकून वामनराव साडेदहा वाजतां 'व्हर्नान'च्या ऑफिसांत गेले. आज वामनरावांचें तोंड विशेष आनंदी दिसत असल्यामुळें स्टूडिओंतील इतर मंडळींना जरासें आश्चर्य वाटलें, व कांहींनीं त्यांना प्रश्नहि केला. परंतु वामनराव कसले खंबीर, त्यांनीं कांहीं दाद लागूं दिली नाहीं, व आपल्याला कदाचित् आग्रह होऊन सोमवारचा दिवसहि पुण्यास राहावें लागेल असें वाटल्यामुळें मुख्य साहेबाला सोमवारची रजा विचारण्यासाठीं ते हळूच कोणाला न समजतां गेले. साहेबाकडून त्यांना ती रजा मिळाली, आणि त्यामुळें आनंदून जाऊन त्यांनीं आपला कोट व टोपी अंगावर चढवून तीनचार जिने धाडधाड उतरून 'व्हर्नान' ची इमारत सोडली.

ज्या वेळीं वामनराव अत्यानंदानें 'व्हर्नान' च्या जिन्याच्या पायऱ्यांवरून उड्या मारीत होते, त्याच वेळीं लोणावळ्याचा त्यांचा आतेभाऊ खिन्न आणि दुःखित अंतःकरणानें लोणावळ्याच्या पोस्ट ऑफिसांत त्यांच्या नांवाची तार करीत होता. त्यांनीं तारेंत मजकूर लिहिला तो असा: "Baboo wishes to see you. Come Sunday." (तुला भेटावयाची बाबूची फार इच्छा आहे. रविवारीं यावें.)

परंतु ही तार मुंबईच्या पोस्टमनच्या हातांत पडली तेव्हां तींत बाबूच्या ऐवजीं बापू असे शब्द पडले.

"Bapoo wishes to see you. Come Sunday."

"तुला भेटावयाची बापूची फार इच्छा आहे रविवारीं यावें."

तारेच्या पाकिटावर पत्ता लिहिला होता तो फक्त

V. G. Joshi,
Girgaum, Bombay.

येवढाच होता; कारण लोणावळयाच्या मंडळींना वामनरावांचा नक्की पत्ता आठवला नाहीं व कोठें टिपलेला असा सापडलाहि नाहीं.

* * *

शनिवारीं सुमारें चार साडेचार वाजतां एक पोस्टमन V. G. Joshi, Girgaum Bombay या पत्त्याची तार घेऊन गिरगांवच्या नाक्याच्या आसपास हिंडत होता. पोस्टमनांनीं संप केल्यामुळें बाहेरगांवचे पुष्कळ लोक पोस्टखात्यानें मुंबईतील कामासाठीं आणले होते. त्यांपैकींच हा पोस्टमन होता. मुंबईच्या वस्तीची व चाळींची कांहींच माहिती नसल्यामुळें पूर्ण पत्ते लिहिलेलीं पत्रें वाटतां वाटतां सुद्धां ज्याचीं हाडें आज तीन दिवस खिळखिळीं झालीं होतीं, त्या या पोस्टमनच्या हातीं अशी मुग्ध व अर्धवट पत्त्याची तार आल्यामुळें त्याची फारच दुर्दशा झाल्यास नवल काय ?

हा पोस्टमन ज्याला त्याला आपल्या हातांतील तारेचें पाकीट दाखवून विचारी कीं हे गृहस्थ नक्की कोणच्या चाळींत राहतात. एखादा टारगट मनुष्य असला कीं, तो ती तार हातांत घेऊन तिच्याकडे व पोस्टमनच्या दीनवाण्या मुद्रेकडे पाही आणि मोठ्यांदा हसून व तार परत देऊन पुढें चालूं लागे. असा दोन तीन वेळां अनुभव आल्यावर त्या पोस्टमननें ठरवलें कीं, चांगला पोक्त व सभ्य मनुष्य दिसला तर त्याला विचारावयाचें, तरुण माणसाशीं प्रसंगच नको. यानंतर थोड्याच वेळांत एक वृद्ध गृहस्थ काठी टेकीत रस्त्यानें जातांना त्याला दिसले, व लगेच आतां जवळजवळ पाठ झालेला प्रश्न त्यानें विनंतिपूर्वक विचारला. म्हातारबुवा प्रथम थोडेसे चमकले. नंतर हातांत तार घेऊन, डोळयांना खिशांतील मोडकी आरशी काढून लावून त्यांनीं पत्ता वाचला, एकदां पोस्टमनाकडे भिंवया किंचित् आकुंचित करून पाहिलें, व घोगऱ्या आवाजानें विचारलें,

"मग ? तुला काय पाहिजे बाबा ?"

पोस्टमननें जरासें बिचकत उत्तर दिलें, "हे गृहस्थ कोणत्या चाळींत राहतात हें मला ठाऊक नाहीं. आपल्याला माहीत असेल तर—"

परंतु पोस्टमनचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच म्हातारबुवा वसकन ओरडून म्हणाले,

"अरे शिंच्या, तुला ठाऊक नाहीं मग मुंबईस आलास कशाला झक मारायला ! म्हणे ठाऊक नाहीं ! आमच्या मुंबईत काम करायचं म्हणजे कांहीं

हजामती नाहीं करायच्या! साहेब म्हणाला पगार देतों—कीं आले गांवो-गांवांहून धावत भुतांसारखे! पण लेको मुंबईच्या पोस्टवाल्यांच्या खेटरांची सर नाहीं तुम्हांला. अरे! आज आठवडाभर काय गोंधळ घातला आहे तुम्हीं! गोम्याचं पत्र माम्याला—माम्याचं पार्सल काक्याला—अन् असं एक का दोन! काय रडावं तुमच्यापुढें! मला नगरहून त्या अंबूताईचं पार्सल यायचं होतं, पण आज आठ दिवस मी शंख करीत बसलों आहें. बरं, प्रत्यक्ष नगराला जाऊन अंबूताईला भेटेन म्हटलं, तर बडोद्याहून बाबूनं मनीऑर्डर केली आहे ती हातांत पडल्याशिवाय माझ्याला पैसे कुठले आणूं! छे—छे—छे—छे—छे! अगदीं नको जीव झाला आहे! तुझ्या साहेबाला सांग जाऊन कीं नारळकराचे अण्णा भेटले होते ते तक्रार करीत होते म्हणून! या साहेबानं तर आमचा जीव घ्यायचं ठरवलेलं दिसताहे! शिव शिव!"

म्हाताऱ्याचें हृदयाविष्करण आणखी किती वेळ चाललें असतें हें सांगणें कठीण आहे. कारण डोळयाचा चष्मा काढून खिशांत घालून चांगलें स्वस्थ-पणें घरची चिमी मोलकरीण, थोरल्या सूनबाई, शेजारच्या कर्व्यांच्या आत्या-बाई वगैरे सर्व मंडळींची हकीगत खुलासेवार सांगण्याचा त्याचा बेत दिसला. परंतु चिमी, सूनबाई, आत्याबाई यांपैकीं कोणाच्याच हकीगतींत पोस्टमनला दुर्दैवानें विशेष स्वारस्य वाटलें नाहीं. म्हणून म्हाताऱ्याच्या हातांतील तार जवळजवळ ओढूनच परत घेऊन तो चटकन् दृष्टीआड झाला; आणि पोस्ट-मनच्या जाण्याला न जुमानतां आत्मगत भाषणाचें महत्त्व ओळखून आपल्या मनाशींच सर्व हकीगत पुटपुटत व पोस्टाच्या साहेबाला शिव्या देत म्हातार-बुवा वाट चालूं लागले.

तारुण्याकडून थप्पड मिळालेल्या त्या पोस्टमनला वार्धक्याकडूनहि पुष्पांजलि मिळाल्यामुळें तो फारच निराश झाला. आशेचा शेवटचा आधार तुटल्यासारखें त्याला वाटलें. आतां कोणालाहि कांहीं विचारावेंसें त्याला वाटेना. अगदीं बारीक तोंड करून एका ठेंगण्या भिंतीला टेकून तो स्वस्थ उभा राहिला. परंतु असें उभें राहून कसें चालणार? तार ज्याची त्याला पोंचवलीच पाहिजे. असा विचार त्याच्या मनांत येत आहे तोंच त्याच्या जवळून साधारण बरा पोषाख केलेले दोन मराठे गेले. त्यांपैकीं एकाच्या तोंडचे शब्द त्या पोस्टमनच्या कानीं ओझरते पडले ते असे—

'अरे पण मी सांगतों ना!... गिरगांवांतल्या प्रत्येक चाळीची अन् माणसाची खडान्खडा माहिती आहे या पठ्याला! नाहीं तर—'

पुढचें बोलणें ऐकूं आलें नाहीं. परंतु जें एक वाक्य कानीं पडलें त्यामुळें त्या पोस्टमनला फार आशा वाटली आणि त्या दोघां मराठ्यांच्या मागें 'मिस्टर मिस्टर' करीत तो धावत गेला. त्याची हाक ऐकून ते दोघे थांबले व वळून पाहूं लागले. त्यांच्या जवळ येतांच पोस्टमन म्हणाला,

"मिस्टर! कृपा करून हे गृहस्थ कुठें राहतात सांगा बरं!" व असें म्हणून त्यानें ती तार ज्या गृहस्थाचे शब्द त्यानें ऐकले होते त्याच्या हातीं दिली.

त्या मराठा गृहस्थानें तार हातांत घेऊन पत्ता वाचला व पोस्टमनकडे तिरस्कारयुक्त नजरेनें पाहत म्हटलें,

"हे गृहस्थ कोणत्या चाळींत, कोणत्या खोलींत राहतात तें सर्व मला ठाऊक आहे. येवढेंच नव्हे तर या गिरगांवांत V. G. Joshi या नांवाचे दोन गृहस्थ आहेत हेंहि मला माहीत आहे. कांहीं घोटाळा होऊन भलत्याची तार भलत्यालाच मिळाली तर वाईट होईल हेंहि मला समजतं. परंतु इतकं असूनहि तुला मदत करावयाची माझी इच्छा नाहीं. ही तार परत घे.'

तार परत घेत पोस्टमन त्या इसमाकडे अत्यंत आश्चर्यानें पाहत राहिला. त्याची ती मुद्रा पाहून तो इसम म्हणाला,

"माझ्या बोलण्याचा तुला विस्मय वाटतो हें ठीक आहे. पण मी कोण आहें तें तुला कळल्यावर तुझं आश्चर्य नाहींसं होईल. आठ दिवसांपूर्वीं मी पोस्टमन होतों व गिरगांवात बटवडा करण्यांत मी आठ वर्षं घालविलीं आहेत. आमच्या न्यायाच्या मागण्या पुऱ्या करून घेण्यासाठीं आम्हीं संप केला आहे. अशा वेळीं आम्हांला आटोकाट मदत करायची सोडून तुम्ही बाहेरगांवचे पोस्टमन आमच्या संपाचा मोड करण्यासाठीं केवळ पैशाला भुलून येथें येतां हें फार मोठं दुर्दैव आहे. तुम्हीं असं केलं नसतं तर तुम्ही धंद्याशीं व धंद्यांतील आम्हां बंधूंशीं इमानी राहिलांत असं झालं असतं. असो. मी कांहीं तुला व्याख्यान देत नाहीं. येथील काम किती बिकट आहे हें तुम्हांला कळून येत आहे हें तरी बरं आहे. रामराम. मला तुला मदत करतां येत नाहीं याबद्दल मला माफ कर. रामराम!'

इतकें बोलून तो मराठा गृहस्थ आपल्या मित्राबरोबर निघून गेला.

पहिल्या टवाळ लोकांच्या चेष्टेचें व मघांच्या म्हाताऱ्याच्या शिव्यांचे त्या पोस्टमनला इतकें वाईट वाटलें नव्हतें, परंतु या संप करणाऱ्या जुन्या पोस्ट-मनचे शब्द त्याला झोंबले. आपण येथें नोकरीवर आलों ही खरोखरच आपली चूक झाली काय? व झाली असली तर तिची आतां दुरुस्त कशी करावी? असे प्रश्न त्याच्या मनांत उभे राहिले; आणि शून्य अंतःकरणानें रस्त्यांतील गर्दीकडे पाहत तो स्वस्थ उभा राहिला.

इतक्यांत फॅशनेबल पोषाख केलेला एक विद्यार्थि त्याच्याजवळ आला व म्हणाला,

"काय? पत्रं आहेत का पार्सलं आहेत तुमच्याजवळ? माझं पत्र असलं तर—"

"माझ्याजवळ पत्रंहि नाहींत व पार्सलंहि नाहींत." पोस्टमन जड अंतः-करणानें म्हणाला व तें ऐकून तो विद्यार्थि पुढें चालूं लागला.

इतक्यांत कांहीं विचार सुचून पोस्टमन त्याच्या जवळ जाऊन म्हणतो, "महाराज, या तारेचे मालक V. G. Joshi कोठें राहतात तुम्हांला माहीत आहे?"

तार हातांत घेऊन त्या तरुण गृहस्थानें पत्ता वाचला व आश्चर्यचकित व आनंदित होऊन म्हटलें,

"काय मजेदार योगायोग! अहो ही माझीच तार! माझंच नांव V. G. Jashi!"

हें ऐकतांच पोस्टमनला आनंद झाला. त्या तरुण गृहस्थाची सही घेऊन त्याला तार देऊन एखाद्या मोठ्या संकटांतून सुटका झाल्याप्रमाणें हर्षित होऊन तो जवळ जवळ धावतच निघून गेला.

*　　　*　　　*

ज्या वामनराव जोशांना ही तार लोणावळ्याहून पाठवण्यांत आली होती ते वामनराव कॉन्ट्रॅक्टरच्या चाळींत आपले कपडे वगैरे व्यवस्थित बांधून घेण्यांत दंग झाले होते; आणि हे तरुण गृहस्थ ती तार घेऊन आपल्या कांदेवाडींतील बिऱ्हाडाकडे चालले होते. हे गृहस्थ फार श्रीमंत होते हें त्यांच्या ऐटबाज पोषाखावरून कोणीहि ओळखलें असतें. हे मुंबईस वुइल्सन कॉलेजांत बी. ए.-

च्या वर्गांत होते. गेल्या मे महिन्यांत यांचें लग्न झालें असून त्यांच्या पत्नीचें नांव इंदिरा असें होतें.

वाट चालतां चालतां विनायकरावांनीं तारेचें पाकीट फाडून मजकूर वाचला, "Bapoo wishes to see you. Come Sunday."

हें वाचतांच विनाकराव चपापले. विनायकरावांचें सासुरवाड पुण्यास होतें, परंतु त्यांचा २५ वर्षांचा मेव्हणा बापूराव आजारी असल्यामुळें त्यास लोणावळ्यास हवा पालटण्यासाठीं ठेवलेलें होतें. तेव्हा 'बापूरावांस भेटण्यासाठीं रविवारीं लोणावळ्यास या' अशा अर्थाची तार वाचून विनायकराव घाबरले, आणि रात्रीच्या पहिल्याच गाडीनें मुंबई सोडण्याचा बेत करून ते घाईघाईनें कांदेवाडींतील बिऱ्हाडीं गेले.

* * *

बोरीबंदरच्या स्टेशनवरून पुण्यास जाणारी रात्रीची पहिली गाडी प्लॅटफॉर्मवर उभी होती. गाडीचें एंजिन नुकतेंच जोडण्यांत आलेलें होतें व गाडी ओढण्याची आपली उत्कट उत्सुकता व्यक्त करण्याकरितां कीं काय सारखें फुसफुस् करीत होतें. पार्सलें योग्य वेळेच्या आंत भरण्यासाठीं पोर्टर व हमाल लोकांची धांदल चालली होती. शुभ्र वस्त्रें परिधान करून आपल्या शुद्ध व पवित्र अंतःकरणांचा हवाला देऊं पाहणारे गार्डसाहेब तोंडानें अग्निपूजन करीत, फर्स्ट व सेकंड क्लासच्या उतारूंच्या डब्यांत आदबीनें डोकावून पहात व थर्ड क्लासच्या डब्यांत वाकून एक दोन शिव्या हासडून दहा बारा गिरणीकामगारांना डब्यांत कोंबीत, गाडीची 'एकंदर व्यवस्था' पहात होते. प्लॅटफॉर्मवरील विजेच्या दिव्यांचा शांत व लखलख प्रकाश पडला होता व विजेच्या पंख्यांनीं आपलें काम इमानें इतबारें चालविलें होतें. एका थर्ड क्लासच्या डब्यांतून बाहेर डोकें काढून इकडे तिकडे नजर टाकीत गाडी निघण्याची वाट पाहणारे आमचे वामनराव कोणालाहि त्या वेळीं दिसले असते. गाडी सुटावयास आतां पांचच मिनिटें अवकाश होता. आतां सर्व उतारू गाडींत बसले होते. गाडी सोडण्यासाठीं गार्ड, स्टेशनमास्तर वगैरे शुभ्रवस्त्रालंकृत अधिकारी प्लॅटफॉर्मवर जय्यत उभे होते. इतक्यांत एक तरुण गृहस्थ हातांत बॅग घेऊन धावत प्लॅटफॉर्मवर आले व तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत जागा पाहूं लागले. सर्व डबे चिकार भरलेले. प्रत्येक डब्यापाशीं

मज्जाव होऊं लागला. सर्व डबे पाहून झाले, पण कोठेंहि जागा नाहीं असें झाल्यामुळें ते तरुण गृहस्थ गोंधळून गेले. इतक्यांत गार्डनें आपली शिटी कर्कशपणें फुंकली. त्या गृहस्थाची गाडी चुकणार असें पाहून आमचे वामनराव ओरडून म्हणाले,

"अहो! इकडे या! मी देतों जागा! या या! चढा लवकर!"

ते तरुण गृहस्थ धावत येऊन डब्यांत चढूं लागले. वामनरावांनीं त्यांचा हात धरला. 'जगा नही, जगा नही!' असा डब्यांतील मंडळींनीं ओरडा केला; पण त्याला न जुमानतां वामनरावांनीं त्या गृहस्थांना आंत ओढलें व गाडी चालूं झाली.

हे तरुण गृहस्थ म्हणजे आमचे विनायकराव होत.

गाडी चालूं होऊन थोडीशी जागा मिळतांच विनायकराव वामनरावांना उद्देशून म्हणाले, "Thank you. आज तुमच्यामुळें मला गाडी मिळाली!"

आपल्या कोटाची बाही नीटनेटकी करीत वामनराव म्हणाले, "छे! छे! असं नाहीं कांहीं! गाडींत जागा मिळवावयाची असली म्हणजे गरीबपणानं वागून चालत नाहीं दुसरं काय! ह्यः ह्यः!"

आगगाडीविषयींच्या व्यवहारांतील हें एक महत्त्वाचें तत्त्व विनायकरावांना शिकवून वामनरावांनीं आपलें सामान व्यवस्थित ठेवलें आणि खिशांतील एक चपटी डबी काढून तींतील एक सिगारेट काढून विनायकरावांपुढें केली. 'Thanks' असें म्हणून विनायकरावांनींहि ती घेतली व ओढून भस्मसात् करून टाकली.

आपली हँडबॅग बाकाखालच्या जागेंत सारीत विनायकरावांनीं प्रश्न केला, "आपल्याला कुठं जायचं आहे?"

"पुण्यास." आनंदित मुद्रेनें वामनरावांनीं चटकन उत्तर दिलें; आणि आनंद पोटांत मावेनासा झाल्यामुळें ते पुढें म्हणाले, "तेथें आमचं सासुरवाड आहे, अन्—" परंतु पुढची गोष्ट न बोलणें बरें असा शहाणा विचार सुदैवानें मनांत आल्यामुळें त्यांनीं तें वाक्य तितकेंच थांबविलें व विचारलें,

"आपण कुठें चाललां?"

"लोणावळ्यास" विनायकराव उत्तरले व हें उत्तर दिल्यामुळें त्यांच्या मनांत आपल्या भेव्हण्याच्या प्रकृतीविषयींचे कष्टप्रद विचार येऊन ते बराच

वेळ स्वस्थ बसले. वामनरावहि कांहीं बोलले नाहींत, व कांहीं वेळानें थंडगार वाऱ्याच्या झुळकेनें व गाडीच्या हेलकाव्यानें त्यांचा देह निद्रास्थितीचा अनुभव घेत डोलूं लागला. विनायकरावहि खिडकीवर डोकें टेकून व डोळे मिटून झोपीं जाण्याचा यत्न करूं लागले. त्यामुळें त्या दोघांचें नंतर कांहींच बोलणें झालें नाहीं.

पहाटे गाडी लोणावळ्याच्या स्टेशनवर येऊन उभी राहिली. विनायकरावांनीं आपली हँडबॅग बाकाखालून काढली. ते आतां डब्यांतून उतरणार इतक्यांत स्टेशनवरील गडबडीमुळें वामनराव जागे झालेले पाहून त्यांजकडे पाहून ते नमस्कार करून म्हणाले, 'बरं आहे! नमस्कार!'

वामनरावांनीं डोळे चोळीत चोळीत दृष्टि वर केली. परंतु त्यांच्या डोळ्यांवरील झोप अजून पुरती गेली नसल्यामुळें त्यांनीं उलट नमस्कार केला नाहीं. गाडीखालीं उतरणारी विनायकरावांची स्वारी त्यांना अंधुकपणें दिसली. त्यांचें नांव विचारून घ्यावयाचें वामनरावांच्या फार मनांत होतें, परंतु त्यांच्या झोपेनें घात केला, आणि विनायकराव प्लॅटफॉर्मवर उतरून दिसेनासे झाल्यामुळें त्यांचा नाइलाज झाला. आतां पुणें लवकरच येणार अशा आनंदी विचारानें त्यांनीं आपले डोळे मिटले व डुलक्या घ्यावयास पुन्हा सुरुवात केली.

अरुणोदय होऊन थोडासा प्रकाश पडला. गाडी पुण्याच्या स्टेशनवर येऊन थांबली. एका हमालाजवळ आपली ट्रंक देऊन वामनराव उतरले. स्टेशनबाहेर येऊन आनंदाच्या भरांत हमालाला पावली देऊन त्यांनीं एक टांगा ठरविला, व सदाशिव पेठेच्या हौदाजवळ दामल्यांच्या वाड्याकडे टांगा हाकावयास टांगेवाल्यास बजावून ते आंत बसले.

टांगा चालू झाला व वामनरावांचे गुलाबी विचारहि चालू झाले. आपण श्वशुरांच्या वाड्यांत पाऊल टाकतों तोंच आपली वाट पाहत बसलेली मंडळी आपलें स्वागत कसें करतील, कदाचित् अंगणांत वाजंत्री वाजत असतील, भटजी मंडळी ओटीवर जमून धर्मविधींची तयारी करीत असतील, आपली पत्नी आपणांस केव्हां व कशी दिसेल, इतर कोण कोण मंडळी जमली असतील, वगैरे कल्पनाचित्रें काढण्यांत वामनराव दंग झाले होते तोंच टांगा एकाएकीं थांबला. 'हेंच का घर महाराज?' असा टांगेवाल्याचा प्रश्न

ऐकून वामनराव आपल्या मनोराज्यांतून जागृत झाले. त्यांना तरी श्वशुरांचें घर नक्की कोठें माहीत होतें ? हौदावर आंघोळ करून एका हातांत धुतलेल्या धोतराची घडी व दुसऱ्या हातांत पाण्यानें भरलेली बादली घेऊन रस्त्यानें जाणाऱ्या एका गृहस्थांस त्यांनीं विचारलें, 'दामल्यांचें घर हेंच का ?' 'होय' असें उत्तर मिळतांच वामनरावांनीं टांग्यांतून एकदम उडी टाकली व ट्रंक घेऊन येण्यास टांगेवाल्यास सांगून व कपडे नीटनेटके करून वाड्यांत प्रवेश केला.

ज्या क्षणीं वामनरावांनीं घरांत पाऊल टाकलें त्याच क्षणीं त्यांच्या आनंदानें त्याच्या मनाबाहेर पाऊल टाकलें. वामनरावांच्या अपेक्षेप्रमाणें वाड्यांत वाजंत्री वाजत असावयाचें लांबच राहिलें, पण वाड्यांत कोणी उठलेलेंहि दिसत नव्हतें. ओटीवर भटजी दिसण्याऐवजीं एक मांजर म्यांव म्यांव करीत जात असलेलें दिसलें. हा देखावा दिसतांच गोंधळून जाऊन वामनराव टकमक पाहूं लागले. टांगेवाल्यानें ट्रंक ठेवून पैशाची मागणी केली. स्टेशनवर हमालाला मोठ्या खुषीनें पावली देणाऱ्या वामनरावांना रास्तपणें पावली मागणाऱ्या टांगेवाल्याचा या वेळीं संताप आला. परंतु संताप प्रदर्शित न करतां त्यांनीं त्याचे पैसे चुकते केले, व टांगेवाला निघून गेला.

त्या आश्चर्यचकित व 'काय करावें, काय नाहीं' अशा स्थितींत वामनराव सुमारें तीन चार मिनिटें उभे होते. शेवटीं त्रासून जाऊन ते ओरडून म्हणाले,

"दामल्यांचं घर हेंच ना ?"

त्यांच्या ओरडण्याला कोणीहि प्रत्युत्तर दिलें नाहीं. वामनराव पुन्हा ओरडले, "घरांत कोणी नाहीं का ?"

इतक्यांत एक बारा तेरा वर्षांचा मुलगा हातांत एक तपेली घेऊन डोळे चोळीत ओटीवर आला. वामनरावांचा प्रश्न ऐकून त्यांजकडे पाहत त्यानें विचारलें, "कोण पाहिजे ?"

"दामल्यांचें घर हेंच ना ?" वामनरावांच्या त्रासाची डिग्री थोडीशी कमी होऊन त्यांनीं विचारलें.

"होय." मुलानें उत्तर दिलें.

"तात्यासाहेब आहेत का ?"

"आहेत. नुकतेच उठून वाचीत बसले आहेत."

"त्यांना सांग मुंबईहून वामनराव जोशी आले आहेत."

मुलगा चटकन आंत गेला व लगेच जरा वेळानें सद्याची पहिली गुंडी घालीत व खाकरत तात्यासाहेब ओटीवर आले. हेच वामनरावांचे श्वशुर. जावयांना पाहतांच नमस्कार करून तात्यासाहेब म्हणाले, "या या! अरे बाबू, विठूला मागील दारून हाक मार अन् ती ट्रंक माडीवर आणायला सांग! आपण या असे या जिन्यानें!"

तात्यासाहेबांच्या प्रेमपूर्ण स्वागतामुळें वामनरावांचा राग बराच शांत झाला. शिवाय वाड्यांत जरी वाजंत्री व भटजी अजून दिसत नसले तरी त्यांत विशेष आश्चर्य नाहीं असें त्यांना वाटूं लागून, कदाचित् सर्व समारंभास उशीरा प्रारंभ व्हावयाचा असेल अशी त्यांनीं आपल्या मनाची समजूत घातली व जिन्याच्या पायऱ्या चढण्यास प्रारंभ केला.

माडीवरील दिवाणखान्यांत गेल्यावर वामनरावांचे कपडे त्यांच्या सासऱ्यांनीं नीटनेटके ठेवले व त्यांना बसावयास आरामखुर्ची पुढें केली. वामनरावहि तिच्यावर बसून दिवाणखान्याच्या भिंती व पटई यांचें परीक्षण करूं लागले.

जरा वेळानें तात्यासाहेबांनीं विचारलें, "आपल्याला आधीं चहा आणूं का आधीं मुखमार्जन करावयाचें?"

आधीं मुखमार्जन करावयाची इच्छा वामनरावांनीं प्रदर्शित केल्यावर तात्यासाहेब त्यांना खालीं घेऊन गेले. वामनरावांनीं मोठ्या उत्कंठेनें माजघर, स्वयंपाकघर वगैरे ठिकाणीं नजर टाकली. परंतु घरांत कांहीं कारुक असल्या-प्रमाणें गडबड कोठेंच दिसेना. वामनराव पुन्हा साशंक झाले—आज तरी घरांत कांहीं असल्यासारखें दिसत नाहीं, हें आहे काय?

तोंड धूत असतां वामनराव विचार करूं लागले. श्वशुरांचें परवां पत्र आलें गर्भाधानविधीसाठीं या, त्याप्रमाणें आपण निघून आलों; या घरांत तर कांहींच गडबड दिसत नाहीं—याचा अर्थ काय?...बाकी आपण आल्याबद्दल कोणाला आश्चर्य वाटत नाहीं त्यावरून आपण येणार अशी सर्वांची समजूत असल्यासारखी दिसते... आणि येणार तर अर्थात् पत्र पाठविल्या-वरून...मग मला वाटतें समारंभ कदाचित् एकादा दिवस लांबणीवर टाकला असला पाहिजे. हो असेंच! म्हणूनच आज सर्व मंडळी स्वस्थ आहेत.

उद्यां व्हावयाचें असेल सगळें...पहा आपण सोमवारची रजा विचारून आलों म्हणून बरें झालें. आतां उद्यां आपल्याला बिनधोक राहतां येईल.

अशा प्रकारें एकंदर सर्व गोष्टींची संगति लावून उल्हसित मनानें वामनराव पुन्हा दिवाणखान्यांत गेले.

जरा वेळानें चहा आला. चहा पितां पितां वामनरावांनीं विचारलें, "माझं पत्र आपणांस मिळालंच असेल?"

"होय" तोंडाजवळ नेलेला पेला बाजूला करून तात्यासाहेब म्हणाले, "उत्तर पाठवण्यांत हयगय झाली—"

त्यांचें वाक्य पुरें व्हावयाच्या आधींच किंचित् हसून वामनराव म्हणाले, "मुंबईच्या संपामुळें फार त्रास झाला आहे! आपण धाडलेलं पत्र मला शुक्रवारीं मिळालं."

वामनरावांच्या शेवटच्या वाक्यामुळें एकदम आश्चर्यचकित होऊन तात्यासाहेब उद्गारले, "काय? मीं धाडलेलं पत्र?"

"होय" श्वशुरांच्या विस्मयाचा अर्थ न कळून वामनरावांनीं म्हटलें. "कां? आपल्याला आश्चर्य काय वाटलं त्यांत?"

पूर्वीपेक्षांहि अधिक आश्चर्यचकित मुद्रा करून तात्यासाहेब म्हणाले, "अहो आश्चर्य म्हणजे! मोठ्याच आश्चर्याची गोष्ट नव्हे का ही! तुमचं पत्र आल्यानंतर मीं तुम्हांला उत्तर कधीं लिहिलंच नाहीं. उलट तुम्हांला पत्र काय लिहावं या विचारांत आज आठ दहा दिवस मी आहें. कारण इंदिराबाईला पाठवून देण्याबद्दल तुम्हीं लिहिलंत खरं, पण ती साताऱ्याजवळच्या एका खेड्यांत आपल्या मावशीकडे गेली आहे. तिला पत्र पाठवून आणावयासच आठ दहा दिवस लागतात. ती इथें नसल्यामुळें तुम्हाला मी नक्की बेताचं पत्र लिहिलं नाहीं. अन् तुम्ही म्हणतां—"

"अहो म्हणतों म्हणजे! मी खोटं का सांगतों!" या एकंदर विचित्र प्रकाराचा संताप येऊन वामनराव म्हणाले, "वाद कशाला? तुमचं पत्र माझ्या खिशातच असेल." असें म्हणून ते उठले. खिशांतील पत्र काढून त्यांनीं तात्यासाहेबांजवळ दिलें व म्हटलें,

"सांगा आतां, मीं खोटं का म्हटलं तुमचं पत्र आलं म्हणून?"

पत्र वाचून वामनरावांकडे पाहत तात्यासाहेब म्हणाले,

" भारी आश्चर्य आहे ! कांहीं तरी घोटाळा होऊन हें भलत्याचं पत्र तुमच्या हातीं आलं आहे. मीं हें पत्र लिहिलं नाहीं, आणि अशा तऱ्हेचं पत्र लिहिण्यासारखं आमच्या घरीं कांहीं झालेलंहि नाहीं. या पत्रामुळें जर तुम्ही आज येथें आलां असाल तर आपणांस फार राग येण्यासारखी वाईट गोष्ट झाली हें खरं. परंतु या विचित्र घोटाळ्यामुळें तरी तुमचं आमच्या घरीं येणं झालं हें पाहून मला थोडासा आनंदच होत आहे. आतां आलांच आहां तर दोन दिवस राहा. आज उद्यां इंदिरा येईल, मग तिला घेऊनच तुम्ही परत जा. मुंबईसारख्या शहरीं कोणी तरी पोक्त माणूस पाहिजे म्हणून मी आपली बहीणहि तुमच्या घरीं पाठविणार आहें."

श्वशुरांचे गोड शब्द ऐकून वामनरावांना समाधान वाटलें. परंतु त्यांच्या कटु निराशेचें व आश्चर्याचें वर्णन कोणी करावें ? मी तरी निदान तें करीत नाहीं. वाचकांनीं काय तें मनांत समजावें.

* * *

लोणावळ्यासहि घोटाळा झाला होता. पहाटे विनायकराव स्टेशनवर उतरले व स्टेशनजवळच असलेल्या रानड्यांच्या बंगल्यावर गेले. याच बंगल्यांत विनायकरावांचे मेव्हणे बापूराव राहत असत. विनायकराव बंगल्याच्या पायऱ्या चढले तेव्हां व्हरांड्यांत निजलेला भय्या जागा होऊन उठला. " कौन है ! " त्यानें विचारलें.

" मी आहें विनायकराव," विनायकरावांनीं उत्तर दिलें, " भय्या, शंकर आचाऱ्याला लवकर दार उघडायला सांग ! बापूरावांची प्रकृति कशी आहे रे ! "

" अच्छा है महाराज " भय्या उत्तरला, " साहेब नऊ वाजल्यापासून साफ सो गया है." असें म्हणून भय्या बंगल्याच्या मागच्या बाजूस गेला व स्वयंपाकाच्या खोलीपाशीं ओरडून त्यानें शंकरला दार उघडावयास सांगितलें.

शंकरनें बंगल्याच्या मुख्य हॉलचें दार उघडतांच विनायकराव आंत शिरले व म्हणाले, " शंकर, बापूराव कोणत्या खोलींत आहेत ! "

थोडासा विस्मित होऊन शंकरनें उत्तर दिलें, " त्या उजव्या हातच्या खोलींत. पण त्यांना आतां उठवणें...सकाळीं सात साडेसातला ते आपोआपच उठतील."

" म्हणजे? त्यांना रात्रीं गुंगीचं औषध दिलं आहे कीं काय?" विनायकरावांनीं प्रश्न केला.

"छे! छे!" शंकर चटकन म्हणाला, "आतांशा त्यांची प्रकृति लख्ख आहे, अन् गुंगीचं औषध कशाला! सात वाजतां उठून ते रोज फिरायला जातात."

" काय म्हणतोस! तुला वेड तर लागलं नाहीं!" विनायकराव उद्‌गारले, " बापूरावांची प्रकृति बिघडल्यामुळें काल तुम्हीं मला तार नाहीं केलीत?"

" निदान मला माहीत नाहीं." शंकर आश्चर्य वाटून म्हणाला, " पण बापूसाहेबांची प्रकृति खुशाल आहे याबद्दल आपण निर्धास्त असा. आपल्याला प्रवासाची दगदग झाली असेल. त्या खोलींत मी आपला बिछाना तयार करतों, आपण कपडे काढा."

शंकर खोलींत गेला व विनायकराव दिवाणखान्यांत कपडे काढूं लागले. ते विचार करूं लागले, कीं हें आहे काय? भेटण्यासाठीं निघून या अशी तार येते काय...अन् येथें येऊन पाहतों तों बापूरावांची प्रकृति उत्तम आहे असें हा शंकर अन् भय्या सांगतात काय?...का या शंकरचा व भय्याचा कांहीं दुष्टपणा आहे यांत? बापूरावांचे पैसे व चीजवस्त लांबवण्याचा जर या दोघांनीं बेत केला असला तर बापूरावांस कांहीं गुंगीचें औषध देण्यास ते कमी करणार नाहींत! हो असेंच! आणि म्हणूनच मी खोलींत जाऊं नये अशी शंकरची खटपट चालली आहे! काय चोर आहेत बेटे! आणि आपला तर्क जर खरा असेल तर आपण निजल्यावर आपलीहि गठडी वळविल्याशिवाय हे राहतील कीं काय! छे!...पण ही शंका भलतीच आहे. शंकर व भय्या अत्यंत विश्वासू नोकर आहेत. पण काय सांगावें! कोणाच्या मनांत केव्हां वाईट बुद्धि येईल त्याचा काय नियम!

इतक्यांत शंकर दिवाणखान्यांत येऊन म्हणाला, " बिछाना तयार आहे."

त्याच्याकडे निरखून पाहतांच विनायकरावांना वाटलें आपली शंका खरी आहे, या बेरडांचा कांहीं तरी कावा आहे. ते म्हणाले,

" शंकर, मला नाहीं निजायचं."

" मग?"

" मला आत्तांच्या आत्तां बापूरावांना भेटलं पाहिजे. नंतर निजेन मी."

" पण—"

"पणबिण कांहीं नाहीं." विनायकराव ठासून म्हणाले.

"त्यांना सुरेख झोप लागली आहे. या वेळीं त्यांना उठविलं तर उद्या त्यांची प्रकृति बिघडेल अशी मला भीति वाटते."

"पण मला नाहीं ना वाटत?" व्यंजक स्वरानें विनायकराव म्हणाले.

विनायकरावांच्या वर्तनाचें आश्चर्य करीत शंकर गप्प बसला. मुकाट्यानें पुढें होऊन त्यानें बापूरावांच्या खोलीचें दार उघडलें व विनायकराव आंत शिरले.

बापूरावांस शांत झोप लागलेली दिसत होती. त्यांची झोप मोडूं नये असें क्षणभर विनायकरावांच्या मनांत आलें, परंतु लगेच शंकरच्या व भय्याच्या काव्याविषयींच्या शंकेचें भूत प्रगट झालें, व त्यांनीं हलके हाक मारली, "बापूराव—"

बापूरावांना गाढ निद्रा लागली होती.

विनायकरावांनीं पुन्हा म्हटलें, "बापूराव!"

या वेळीं बापूरावांनीं जागच्या जागीं थोडीशी चळवळ करून 'अं-अं–' असें केलें; परंतु पांघरूण ओढून घेऊन ते पुन्हा निजले.

बापूरावाच्या या चळवळीमुळें विनायकरावाच्या मनांतील दुष्ट शंका नाहींशी झाली, व आतां विनाकारण बापूरावांची झोप मोडण्यांत अर्थ नाहीं असें वाटून ते आपल्या खोलींत जाऊन निजले.

सकाळीं साडेसात वाजतां कोणी तरी हाक मारल्यामुळें जागे होऊन विनायकराव पाहतात तों त्यांच्याजवळ बापूराव बसलेले. तेहि आपल्या अंथरुणावर उठून बसले.

"पहाटेच आलांत म्हणे?" बापूराव म्हणाले.

"होय." उजवा डोळा चोळीत विनायकराव म्हणाले.

"मग आतां पुण्यास कोणत्या गाडीनें जाणार?"

"पुण्यास! तें कशाला?"

"म्हणजे! तुम्ही पुण्यास जाणार नाहीं? मी समजतों कीं, पुण्यास जातांना वाटेंत तुम्ही माझ्या समाचाराला आलांत!"

"शाबास बापूराव!" विनायकराव उद्गारले, "अहो भेटायला निघून येण्याविषयीं तुम्हींच ना तार केलीत मला!"

" तार ! अन् मीं केली !" बापूराव आश्चर्यानें म्हणाले, " तुम्हीच पाहत आहां ना माझी प्रकृति किती उत्तम आहे ती ! अन् मी तार कशाला करूं !"

" जास्त कशाला ?" अंथरुणावरून उठून दिवाणखान्यांत जात विनायकराव म्हणाले, " तुम्हांला तारच दाखवतों म्हणजे झालं." असें म्हणून त्यांनीं तार आणून बापूरावांच्या हातीं दिली.

" मोठं आश्चर्य आहे !" तार वाचून बापूराव म्हणाले, " मीं ही तार धाडली नाहीं अन् धाडायचं मला कांहीं कारण नाहीं हेंहि तुम्हांला दिसतंच आहे. या तारेचा कांहीं तरी घोटाळा आहे."

विनायकराव कांहींच बोलले नाहींत.

" आणखी एक दुसरा घोटाळा झाला आहे." बापूराव म्हणाले.

" कोणता ?" विनायकरावांनीं विचारलें.

" तुम्ही आज पुण्याला जाणार आहांत ?"

" नाहीं."

" पुण्यास येण्याविषयीं बाबांचं तुम्हांला कांहीं पत्र नाहीं आलं ?"

" बिलकुल नाहीं."

" हाच तो दुसरा घोटाळा." बापूराव म्हणाले, " मोठी मजा आहे. काल मला बाबांचं पत्र आलं कीं, इंदिराताईचा गर्भाधानसमारंभ रविवारीं आहे, तूं निघून ये. शिवाय त्यांच्या पत्रांत असंहि होतं कीं, रविवारीं जरूर निघून येण्याविषयींचं पत्र मुंबईस जावईबुवांना आधींच गेलेलं आहे. तुम्हांला तें पत्र नाहीं मिळालं ?"

" काय बापूराव !" विनायकराव हसून म्हणाले, " मला बनवायचा विचार आहे वाटतं !"

समारंभाविषयीं विनायकरावांची खात्री पटेना. आपली मस्करी करण्याचा बापूरावांचा बेत आहे अशी त्यांची पक्की समजूत होती. बापूरावांनीं पुष्कळ [illegible] पाहिलें, पण त्यांचा विश्वास बसेना व ते सारखे हसूं लागले. शेवटीं, वडिलांचें पत्र जेव्हां बापूरावांनीं दाखविलें तेव्हां त्यांची वृत्ति बदलली, व [illegible]ाप्रमाणें भलत्याची तार आपल्या हातीं आली त्याप्रमाणें आपलें पत्र दुसऱ्याच्या हातीं गेलें असावें असें त्यांना वाटूं लागलें.

बापूरावांनीं पुष्कळ आग्रह केल्यानंतर त्यांच्याबरोबर पुण्यास जावयाचें विनायकरावांनीं कबूल केलें.

* * *

इकडे विनायकरावांच्या सासरीं कोण गोंधळ! नानासाहेबांनीं जावई-बुवांच्या स्वागताची जय्यत तयारी केली होती; पहाटे पांच वाजल्यापासून वाजंत्री येऊन बसले होते; भटजी मंडळी सर्व तयारी करून बसली होती; घरांतील बायकांनीं विनायकरावांच्या पत्नीला सजवून ठेवली होती—परंतु जांवईबुवांचा ठिकाण नाहीं. सहा वाजले, साडेसहा झाले, साताचे ठोके पडले, साडेसात होऊन गेले—तरी जावईबुवा कोठें आहेत ! सर्व मंडळी काळजी करूं लागली. शेवटीं सर्व गाड्यांची वेळ टळून गेलेली पाहून मंडळींच्या सल्ल्या-वरून नानासाहेबांनीं जावयांच्या नांवानें मुंबईस प्रीपेड तार केली, साडेनऊ झाले तरी तारेचाहि जबाब नाहीं. आतां मात्र सर्वांना फारच चिंता वाटूं लागली. कोणी म्हणाले पुन्हा तार करा, कोणी म्हणाले मुंबईस माणूस पाठवा—जो तो आपापल्यापरी उपाय सुचवूं लागला. दहा वाजले, साडेदहा वाजले—सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. काय करावें—काय नाहीं असें नानासाहेबांना झालें.

इतक्यांत दारापाशीं एक टांगा थांबला व सर्व मंडळी दारांत धावत आली. बापूरावांस व विनायकरावांस पाहून 'जावई आले! जावई आले!' असें सर्वजण ओरडले. एका क्षणांत सर्व घरभर आनंदी आनंद झाला—'जावई आले!' वाजंत्र्यांनींहि वाजंत्री वाजवून आनंद साजरा केला.

काय घोटाळा झाला हें सगळ्या मंडळीला जेव्हां बापूरावांनीं सांगितलें तेव्हां सगळ्यांना मोठी मौज वाटली. घरांतील बायकामंडळीहि हसूं लागली. आत्याबाई म्हणाल्या, "संप बरं! हा संप! त्या साहेबाला म्हणावं—बघ हे असे अनर्थ होतात तुझ्या संपानं!"

यानंतर समारंभ उत्तम प्रकारें पार पडला. विनायकरावांची चेष्टा करा-ण्यास मात्र लोकांना एक कायमचा विषय मिळाला.

वामनराव पत्नीसह मुंबईस गेले. त्यांचीहि इच्छा लवकरच पूर्ण झाली. पत्राची व तारेची चुकामूक कशी झाली हें मात्र कोणासच केव्हांहि कळलें नाहीं.

—प्रभात : सप्टेंबर १९१७.